संगीत

# कादंबरी नाटक.

हें पुस्तक

**केशव मोरेश्वर काणे**

संगीत नलदमयंती, विक्रमोर्वशी, इत्यादि नाटकांचे कर्ते

यांनीं तयार केलें तें

**दत्तात्रय गोविंद सट्टेकर**

म्यानेजर लोकमित्र

मु० खानापूर

यांनीं

बेळगांव येथें 'धुंडिराज' छा० छा० प्र० केलें

---

सन १८९४ इ०

---

किंमत १० आणे.

# प्रस्तावनेदाखल दोन शब्द.

शालिवाहन शकाच्या सुमारें सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत काश्मीरचा राजा जो श्रीहर्ष त्याच्या पदरीं बाणभट्ट ह्मणून मोठा विद्वान व रसिक कवि होऊन गेला. ह्या कवीनें बरेच ग्रंथ केल्यावर कादंबरी नांवाची ही कल्पित कथा रचण्यास आरंभ केला. दुर्दैवानें हा ग्रंथ सर्व रचून तयार होण्यापूर्वींच त्यास मृत्युनें गांठलें! त्यामुळें त्याचे हातून हा ग्रंथ पूर्ण न होतां अर्धाच राहिला. त्याचा पुत्र जो भूषणभट्ट हाही विद्वत्तेंत आपल्या पित्याप्रमाणेंच निघाल्यामुळें त्यानें आपल्या पित्याची ही कृति शेवटास नेऊन कथेस पूर्णत्व आणिलें.

हा ग्रंथ संस्कृतांत असून, ह्या कथेंतील भाग फारच मनोरम परंतु अवघड आहे. एकदोन वेळ साधारण वाचून ध्यानांत येत नाहीं. मूळ कथा लहानच आहे; परंतु बाणकविच्या अचाट कल्पनेनें व शब्दालंकाराच्या विलक्षण चातुर्यानें ह्या कथेचा विस्तार बराच भरून त्यास मोठें स्वरूप आलें आहे.

ह्याच कादंबरी ग्रंथाच्या आधारानें संगीतबद्ध नाटक करण्याबद्दल श्रीमन्माहाराज होळकरसरकार ह्यांजकडून जाहिरात प्रसिद्ध झाली होती. दिलेले मुदतींत सदरहु पुस्तक तयारकरून पाठवावें असें मनांत आणून, पुस्तकांतील भाग नाटकरूपानें रचण्यास सुरवात

केली; परंतु कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें सदरहु भाग मुदतशीर तयार झाला नाहीं, त्यामुळें पुढील बेत रहित झाला. पुस्तक साग्र तयार झाल्यावर, तें स्वतंत्र छापून प्रसिद्ध करण्याबद्दल आमचे मित्र रा. **दत्तात्रय गोविंद सडेकर** लोकमित्राचे म्यानेजर यांनीं आपली इच्छा दर्शविल्यावरून, पुस्तक तसेंच राखून ठेवण्यापेक्षां तें छापून प्रसिद्ध झाल्यास चांगलें, असें मनांत आणून त्यांस, छापून प्रसिद्ध करण्याबद्दलची परवानगी आनंदानें दिली.

सदरहु पुस्तकाचा भाग नाटकरूपानें संस्कृत व प्राकृत ग्रंथाधारें तयार केलेला आहे. प्रयोगाकरितां येणाऱ्या अडचणी होतील तितक्या कमी करून प्रयोगांतील कथेचा भाग ध्यानांत येण्याजोगा सुलभ केला आहे. ह्या नाटकांत शृंगाररस पूर्ण असून, शोक व करुणा, हे अंगभूत आहेत.

एकंदरींत केलेला प्रयत्न विद्वज्जनांस मान्य होऊन श्रमांचें चीज व्हावें हीच इच्छा आहे. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचें महत्त्वाचें काम, आमचे मित्र रा. **दत्तात्रय गोविंद सडेकर** यांनीं पत्करिलें असल्यामुळें या त्यांचे उपकाराबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा फार आभारी आहे.

अहिबाग.
मिति श्रावण शुद्ध १४.
शके १८१६

**केशव मोरेश्वर काणे.**

# नाटकांतील पात्रें.

सूत्रधार............नाटककर्त्ता.
नटी..................त्याची स्त्री.
पुंडरीक............उपनायक [ श्वेतकेतूचा पुत्र. ]
कपिंजल.... ....पुंडरीकाचा सखा.
चंद्रापीड......{ चंद्राचा अवतार तारापीड राजाचा पुत्र. नायक.
वैशंपायन........गतजन्मींचा पुंडरीक चंद्रापीडाचा सखा.
केयूरक.... ....कादंबरीचा वीणाधारी.
कंचुकी.... ....तारापीडराजाच्या अंतःपुरांतील सेवक.
मेघनाद.... ....चंद्रापीडाचा सेनापती.
इंद्रायुध........{ शापामुळें झालेला अश्व. [ गतजन्मींचा कपिंजल. ]
महाश्वेता......{ गंधर्वराजकन्या, कादंबरीची सखी. [ उपनायिका. ]
कादंबरी.... ....गंधर्वराजकन्या, नायिका.
पत्रलेखा......{ रोहिणीचा अवतार [ चंद्रापीडाची सहचारिणी. ]
तरलिका.... ....महाश्वेतेची सखी.
मदलेखा, वसंतिका }....कादंबरीच्या सख्या.
लक्ष्मी.... ....{ पुंडरीकाची माता. [ वेषधारी चांडाल कन्यका. ]

॥ श्रीगजानन. ॥

# संगीत कादंबरी नाटक.

---

## अंक १ ला.

### नान्दी.

धृपद–( जयजयवंती–चौताल. )

नमो हे मुकुन्दा नमो सुखद सुकन्दा मुकुन्दा
सुखदा वन्दे ताप हरुनि पाव ॥ धृ० ॥
महायोगि ध्याति पाद भो हरि अपदा हारेशी
तयांसि स्वरुपीं प्रेमभरें करुनि देशी ठाव
॥ नमो० ॥ परब्रह्मरूप मूळ व्यापक नच तूंवि
दुजा ह्मणोनी चरणीं अर्पितसें कवन सुमन
माल ॥ नमो० ॥ अहंकार ने लयास मंगल यश
दे कवनीं सुकाव्या मतितें देह हरी अशिव
धांव पाव ॥ नमो हे मुकुन्दा नमो० ॥ १ ॥

पद–( आरबी–आदिताल–सांबसुराभरणा. )

सुखद तुह्मां होवो । शंकर । सर्व दुरित पळवो ॥
शंकर । अर्धांगीं प्रिय गिरिजा विलसे ।
इच्छित मनिंचें सकलही पुरवो ॥ नव–नाटक

रीती दावी । माझी अल्पमती । जन हो ॥
प्रीय करुनि घ्या ती । आजी । सद्गुण प्रिय
असती । सकलां । हिमनगजाधव प्रेमें ध्याई ।
केशव कवि कृतिला यश येवो । सुखद० ॥

( मंगलाचरण झाल्या नंतर सूत्रधार पुढें येऊन, )

सूत्र०—पुरे हा विस्तार. आज श्री महाकाळेश्वराचे उत्सवांत जमलेल्या सर्व विद्वज्जन समुहापुढें, नवीन कादंबरी नामक नाटकाचा प्रयोग करून दाखविण्याविषयीं, श्रीमन्महाराज यांची आज्ञा झाली आहे; तर आतां त्या तयारीला लागलें पाहिजे. ( पडद्याकडे पाहून ) माझ्या प्रियेला येण्याला विलंब कां बरें लागला ? आर्ये, पडद्यांतील सर्व सिद्धता झाली असल्यास अंमळ इकडे ये.

नटी—( प्रवेश करून ) ही मी आलें. काय आज्ञा आहे ?

सूत्र०—

पद—धुमाळी.

बाणकवीकृत कादंबरी नव काव्य बंध जो
लोकीं ॥ प्रियसंगीतीं रंजन व्हाया रचिला
दाऊं आज कीं ॥ पात्रें सजवावीं । चिंता
दूर करावी ॥ १ ॥

नटी—प्राणनाथ, आपण तर त्यांत कुशल आहां. मी काय करावें तो आज्ञा व्हावी.

सूत्र०—आर्ये,

पद (यमन—दादरा.)

करुनि मधुर गायनास। तोषवी सभाजनांस ॥
कुसुमरसा लुब्ध भृंग। गीतरसा रसिक दंग ॥
मंजुगान प्रिय जनांस। संतोषहि मन्मनास॥१॥

नटी—ठीक आहे—

पद (खमाज—आद्धिताल.)

जनमन प्रियकर माधव रमवी ॥ प्रियजन नटति सजति प्रिय वदनीं। मानवती रति वरीत काम। कामिनी मन प्रीयकर माधव रमवी ॥ धृ० ॥ विविध सकल तरु हे डुलति किती। शाखिलता अति रमणिय सुकृति। भूषणयुत जणूं सुंदर कामिनी ॥ जनम०॥ १ ॥

(इतक्यांत पडद्यांत शब्द होतो.) "नाटकाचार्य, त्वरा कर त्वरा कर. कारण भगवान् महाकालेश्वराचे वरप्रसादानें राजा तारापीड यांस पुत्ररत्न झाल्यामुळें अत्यानंद होऊन, सर्व जनसमूह महोत्सवांत निमग्न झाले आहेत व राजा तारापीड पुत्ररत्न अवलोकनार्थ विलासमंदिरीं परिजनांसह निघाला आहे, त्याचा हा प्रवेशकाल आहे."

सूत्र०—(ऐकून आनंदानें) वाहवा! फार चांगली गोष्ट झाली! उज्जयनीचा महाप्रतापी राजा तारापीड यांस पुत्ररत्न झालें हें या प्रसंगीं आमचें प्रियच झालें.

आतां कुमाराची बालक्रीडा राजास व राणीस आनंद देणारी होईल यांत नवल नाहीं.

( इतक्यांत पडद्यांत )

" शिवरूपीं रंग मना या ॥
व्यापक पालक दृग्भासा या ॥ "

नटी–हा मधुर ध्वनी कोणाचा असावा ?
सूत्र०–प्रिय एक–

पद. ( पिलु–झिंझोटी–दादरा. )

मधुला भृंग जसा लोलुप हो प्रेमानें ॥
रमतें मानस हें गीत मधुर गानानें ॥
मुनिवर वंद्य असे ईशभजन च्छंदानें ॥
धरुनी वेष सखे तोषवुं या फंदानें ॥ १ ॥

( जातात. नंतर पुंडरीक व कपिंजल प्रवेश करतात. )

पुंडरीक–( आपल्याशीं )

पद ( पिलु आदिताल–सोच समज नादान )

शिवरूपीं रंग मना या । व्यापक पालक दृग्भासा या ॥ धृ० ॥ निखिल निरंजन निर्गुण तो शिव । आद्यसनातन चालक जो या ॥ १ ॥ चित्सुखधामा पूर्ण प्रकामा । पार न लागे तव अगमा या ॥ २ ॥ चंद्रशिरीं करभूषण पन्नग । अर्ध शरीरं वरी प्रिय जाया ॥ ३ ॥

तारक मारक भोळा शंकर । भक्तजनप्रिय ने निजठाया ॥ ४ ॥

या भवसागरांतून पार होण्यास परमेश्वर भजनावांचून सुलभ उपाय नाहीं.

**गजल** ( भीमपलास आदिताल. )

भवाब्धी घोर हा सारा । पसारा व्यर्थ हा वारा ॥ नसावा ताप हा सारा । स्मरावा शंभु दे थारा ॥ हरी माया असे भरली । जगातें व्यापुनी उरली ॥ क्षणैकें लोपती सगळीं । भजोनी मोक्ष स्वीकारा ॥ मदांधें वागतां तोटा । वरीना काम तो खोटा ॥ रिपू तो क्रोधही मोठा । धरोनी शांतता वारा ॥ असावी शांतता देहीं । न मानीं सौख्य या गेहीं ॥ तपानें पूर्णता पाहीं । नमावा ईश उद्धारा ॥ १॥

पुंड०-सख्या कपिंजला, या शांत व निर्विकार अरण्यांत काळ घालविणें, सुखाचें मानतात हें खरें.

कपिं०-पुंडरीका, ब्रह्मदेवा प्रमाणें त्रिभुवनास जो वंद्य, जो कलिकालानें देखील पाहिला नाहीं, आणि ज्या ठिकाणीं अनृताचा परिचय नसून जेथें षड्रिपूंचें वारेंही नाहीं, असा हा अनेक गुणसंपन्न पुण्याश्रम, व त्या आश्रमानें वेष्टिलेली जी ही पुण्यभूमि ती धन्य होय.

पुंड०-( इकडे तिकडे फिरून व पाहून आनंदानें ) कपिंजला—

पद. ( अबहो लालन. )

सखयां या वनभागीं सुख होई बरें ॥ सतत
मुदित हा सुमन विमल वनभाग अहा ॥ धृ०॥
उपजे मोठा तोष आश्रमीं मन राहे ॥ विसरे
जगतासी शांत आश्रमीं जो राहे सतता ॥ १ ॥

इकडे पहा या वनप्रदेशांतील गगनचुंबित वृक्षांवरून रम्य लतासंघ वेष्टिलेले असून, हीं लक्ष्मीचीं वसतिस्थानेंच आहेत काय, असा भास होतो.

कपिं०—पुंडरीका—

पद. ( बागेसरी—बहार—त्रिवट. )

निबिडतरू आमराई । भाग्यहीन जो वन ना
पाही ॥ धृ०॥ विविधतरूवर गगना शिवती ।
तरू पल्लव हीं पुष्पदलें किती ॥ लता प्रतानाहि
सांताचि शिरती । रम्य विटप घनछाया
सुखवी ॥ १ ॥

पुंड०—सख्या, कपिंजला जों जों या वनप्रदेशाकडे दृष्टि द्यावी, तों तों त्याचा अलौकिक देखावा, मनाला फारच आनंदित करतो—

पद. ( धनाश्री—धुमाळी—उद्धवा शांतवन कर जा. )

ही विचित्र शोभा रमवी सुख विपिनीं बहु-
ल असे कीं ॥ धृ० ॥ तरु पल्लव पुष्पभरानें
शृंगारित येत विलोकीं ॥ ठाइठाइ विकसित

**कुसुमें मधुलोलुप मधुकर होती ॥ स्वर पंचम कोकिल गाती प्रेमानें तरुवर डुलती ॥ वन वनिता तरुवर वरिती चुंबनसुख प्रेमें घेती ॥१॥**

**कपिं०**—सख्या पुंडरीका, या वनप्रदेशांतील वनश्रीच्या कौतुकावलोकनानें, ताताज्ञेचें अगदींच विस्मरण झालें; कारण स्नानसंध्यादि नित्य प्रातर्विधी आटोपून अग्निदेवतेची पूजा करण्यास्तव लौकर परत यावें अशी तुझ्या पित्याची आज्ञा आहे. तर चल, प्रथम अच्छोद सरोवरीं जाऊन प्रातर्विधी आटोपूं; आणि नंतर आश्रमीं जाऊं.

**पुंड०**—ताताज्ञेचें उल्लंघन कोण करील? चल तर.

( जातात. )

( इतक्यांत महाश्वेता तरलिकेसह प्रवेश करिते. )

**महा०**—तरलिके, या सर्व चिन्हांवरून वसंतऋतूचे दिवस अगदीं जवळ आलेसे वाटतात—

**पद** ( झिंझोटी त्रिवट )

**दक्षिण वायू सुखकर वाही । सकल जनांतें प्रियकर होई ॥ ध्रु० ॥ कोमल पल्लव सुमनें फुलती । रम्य लता नव तरुवर फुटती ॥ सुगंध लोलुप मधुकर होती ॥ १ ॥**

**तर०**—तो पहा माधवीलतेचा मंडप, पुष्पभरानें कसा शोभिवंत दिसत आहे.

**महा०**—इकडे पहा—

पद. ( पिलु–जिल्हा–इसतनधनर्का० )

वृक्षलता तल पुष्पभरानें । शृंगारित हो प्रिय-
कर मानें ॥ विचित्र भूमी रमणिय दिसती ।
वनोपभागीं शोभती सुमनें ॥ १ ॥

आणखी पहा—

पद. ( अंजनी गीत. )

लता विटप हे पुष्पित होती । वनभागातें
शोभित करिती ॥ वन कमलें हीं रमणिय
दिसती । वसंत समयामी ॥ १ ॥

तर०—राजकन्ये, आतां हें वनप्रदेश अवलोकनाचें
कौतुक पुरे, अच्छोद नामक सरोवर इथून जवळच
आहे, तिकडे जाऊन नित्यकर्म आटोपून आपल्याला
लवकर मातेचे दर्शनास परत गेलं पाहिजे.

महा०—चल तर तिकडेच जाऊं. ( जाऊं लागतात,
व सभोंवतालची शोभा पाहून महाश्वेता आनंदानें ) तर-
लिके, या वनप्रदेशांतील नानाविध पुष्पांचा सुगंध लो-
पवून टाकणारा आणि घ्राणेंद्रियाची तृप्ति करणारा ज्या-
च्या मागून हे भ्रमरसंघ लुब्ध होऊन धांव घेत आहेत,
असा हा विलक्षण परिमल कुठुन येत आहे बरं?

पद. ( जोबनवा जोर. )

हर्षांत गंध सुखवीत फार। सकल सुखद हरी
सुमनसार ॥ ध्रु० ॥ सकल फुल्लतरु देत सु-

स्वामी । मन चंचल वरी सौख्य सार ॥ ह०॥
सुमन गंध आति मंद वहाती । वन वल्लरी
वरी तेज फार ॥ ह० ॥आम्रवृक्ष दे हर्ष म-
नाशीं । किती सुखवी करी फार गार ॥ह०॥

तर०—या अच्छोद सरोवराचे दक्षिणतीरावर चंद-न वृक्षांची दाट राई आहे, त्याचा हा मधुर परिमळ असावा.

महा०—चल तर त्या मधुर सुगंधाच्या सेवनानं आपल्या आत्म्याला संतुष्ट करूं. ( जातात तों पुंड-रीक व कपिंजल प्रवेश करितात. )

कपिं०—पुंडरीका, हा पहा अच्छोदनामक सरोव-रानें वेष्टिलेला वनप्रदेश किती रमणीय भासत आहे.

**पद.** (आष्टपदीचे चालीवर.)

सुखवी अमित वन प्रिय नयनातें । तोषित
करी हा सकल जनातें ॥ शोभतो किती
मुनिसहवासें । भाग वनाचा सुखकर वि-
लसे ॥धृ०॥ वल्लि तरूंवरी पल्लवि येती । सु-
मनभरानें पवनें डुलती ॥ शोभ० ॥ हंस
मयूरी कोकिल गाती । मंजुस्वन शुक पक्षी
करिती ॥शो०॥ आम्र बकुलि नवमालती
डोलती । रुद्राक्षांचीं रानें दिसती ॥ १ ॥

पुंड०—( पाहून ) हेंच तें अच्छोद सरोवर, व हें

श्रीभवानीपतीचें पुण्यस्थान. आतां श्रीशंकराचे पूजनानें आत्म्यास संतुष्ट करूं चल. ( असें ह्मणून अच्छोदसरोवरीं जातात. )

तर०—हाच पुण्यस्थान अच्छोदसरोवराचा आसमंत भाग.

महा०—तरलिके, ज्या मधुर सुवासानं माझं मन वेधून टाकलं आहे, व ज्याचे ठिकाणीं हे मधुकर लुब्ध होऊन गुंजारव करीत घिरट्या घालीत आहेत, तें मधुर सुवास वसतिस्थान येथून जवळच असेलसं वाटतं. ( असें ह्मणून पुंडरीक ज्या ठिकाणीं होता तिकडे एकसारखी दृष्टी लावून पहाते. )

तर०—( महाश्वेता स्तब्ध उभी राहिलेली पाहून ) महाश्वेते, तुझी दृष्टी इतर व्यापार सोडून कोणत्या मोहक वस्तूनें हिरावून नेली; आणि तूं अशी निश्चल काय झालीस?

महा०—( आपल्याशीं ) या अपरचित जनाला पाहून, माझ्या मनांत या तपोवनाला अयोग्य, असे विकार कां बरं होतात! ( उघड ) अग तरलिके, हें तं कसं जाणत नाहींस? सकलकलापरिपूर्ण मंडळाची प्राप्ति होण्याकरितां व्रत नियम धारण करणारा; आणि जो भगवान् भवानीपतीचे मस्तकावर शोभत असणारा रोहिणीपती, तो उदय पावत आहे, त्याकडे पहात आहें. ( ऋषिकुमाराकडे पाहत स्तब्ध उभी राहते. )—

तर०—( आपल्याशीं, ) एकूण इची दृष्टी त्या

महानुभावावर गेली आहे. आतां थोडी गंमत करावी. (उघड) राजकन्ये, तो आकाशभागीं शोभणारा रोहिणी-पती नसून, तत्समान जलाशयांत प्रतिबिंबीत असणारं प्रफुल्लित पुंडरीककमल आहे, त्याचे दर्शनानं आपले नेत्र कां कष्टवितेस ?

**महा०**—अग वेडे, दर्शनीय वस्तू पासून कष्ट न होतां आनंदच होतो. ( मदनानें व्याकुळ होऊन आपल्याशीं ) ज्याच्या रूपसौंदर्याचा त्रिभुवनांत डंका वाजत आहे, त्या रतिपतीस देखील ज्यानं मागं टाकलं, असा हा पुण्य-पुरुष कोण असावा बरं ? विमानसंचारी देवगणांपैकीं तर कोणी नसेलना ! (पाहून) हा कोणी ऋषीकुमार असावा. कारण—

**पद.** ( पिलू—जिल्हा—घोरभयंकर निर्जल विपि० )

**वल्कल वेष्टित काया असुनि जटाभार तो शिरीं ॥ भाल कपालीं त्रिपुंड्र शोभे दंड काष्ठ तें करीं ॥ स्मरधनुरज्जू तत्सम शोभे यज्ञसूत्र तें उरीं ॥ रुद्राक्षांच्या माला कंठीं स्फटिकमाळ ती करीं ॥ पुष्प मंजिरी भूषण व्हाया शोभत कर्णांवरी ॥ सुगंध लोलुप मानस होई रूप गुणें जो हरी ॥ १ ॥**

बरं ऋषीकुमार ह्मणावा, तर अत्यंत क्लेशदायक जें तपश्चर्याकर्म, त्या कर्मीं हा कुमार निमग्न असतां हीं लावण्य संपत्ती निर्विकारपणं याच्या ठिकाणीं कशी राहिली !

तर०—महाश्वेते, त्या ऋषीकुमाराच्या रुपसंपत्तीनं तुझ्या मनाची चंचलवृत्ति झाली, आणि तूं त्या कुमाराकडे निश्चल व स्पृहायुक्त दृष्टीनें पहातेस हें तुजसारखे राजकन्येस योग्य नाहीं; कारण तो कुमार आपणांस वंद्य आहे.

महा०—( दुःखानें श्वास टाकून ) बाई तरलिके, माझें अंतःकरण अत्यंत व्याकुळ झालं आहे, तें आवरून धरण्यास मी समर्थ नाहीं; ह्मणून तुला सांगते कीं, जों पर्यंत ही माझी स्थिति त्या कुमारानं स्पष्टपणं जाणली नाहीं, तोंपर्यंत या प्रदेशापासून दूर जावं हें बरं; कारण तो ऋषीकुमार, त्याला न आवडणारं हें माझं चेष्टित वर्त्तन पाहून मला शाप देईल. मुनिजनांची प्रकृती फार शीघ्रकोपी असते. [ असें ह्म० दूर जाते ]

तर०— राजकन्ये, हें काय? अग सर्वजनांस वंद्य जे ऋषी, त्यांस वंदन केल्याशिवाय निघून जाणं हें आपणांस योग्य नाहीं; तर चल आपण त्यांचें दर्शन घेऊं. (असें ह्मणून महाश्वेतेला घेऊन पुंडरीकाजवळ जाते. )

पुंड०—सख्या कपिंजला, इकडे पाहिलेंस का—

पद. ( छायानट—त्रिवट. )

**किती मधुरा वन मालिका । मोहक भारी अलौकिका ॥ धृ० ॥ वन्यलता ही सजली नटली । सुंदर ललना सुमना भरली ॥ दावि तसे वन कौतुका ॥ १ ॥**

तर०—राजकन्ये, आतां विलंब कां? लज्जेचा त्याग करून, मुनिजनांस वंदन कर.

महा०—बरं तर तसंच करतें—( असें ह्मणून पुढें होऊन व वंदन करून, )

पद.

विनवितें सदया जोडुनि पाणी ।
त्वरित शुभ करी आशा ही मनीं ।
प्रियकरा दर्शन त्वादिय मजला ।
सुदिन हा गमे विधिनें योजिला ॥ १ ॥

पुंड०—( महाश्वेतेचें सौंदर्य पाहून चकित होतो. ) अरे काय हा चमत्कार! या विलक्षण सौंदर्यानें माझ्या मनाची अशी विलक्षण स्थिति कां बरें झाली!!

पद. ( दिलकू चैन० ही चाल. )

प्रकटतां ही भासते विद्युल्लता मेघांतली ॥
चमकते, ही कामिनी मन्थानलातेंही हरी॥ ध्रु.॥
इंदुवदना सुंदरा कमलोद्भवा गजगामिनी ॥
नेत्र बाणें वेधिते हृदयास असें सुंदरी ॥ १ ॥
मोह पाडी अंतरीं प्रीतीस दावी ही वरी ॥
ध्यान तपही नष्टलें प्रेम ग्रंथि जोडली ॥ २ ॥

( असें ह्मणून महाश्वेतेकडे पाहत स्तब्ध बसतो. )

कपि०—( आपल्याशीं ) काय आश्चर्य! ज्या प्रमाणें वायु दीपास चंचल करितो, त्याप्रमाणें या लोकोत्तर स्त्रीसौंदर्यानें माझ्या मित्राचें चित्त चंचल केलें. भवितव्यते पुढें उपाय नाहीं. ( महाश्वेतेकडे पाहून व बोटानें दाखवून ) हे सौंदर्यलतिके, ही सुफलित कल्पवृक्षाची छाया, विश्रांति घेण्यास योग्य आहे; या ठिकाणीं क्षणभर बसून विश्रांति घ्यावी.

तर०—राजकन्ये, मुनिवचनास मान दिला पाहिजे.

( असें ह्मणून दोघी वृक्षाखालीं बसतात. )

महा०—( उत्सुकतेनें ) बाई तरलिके, हे समवयस्क ऋषिकुमार कोण असावे बरं?

तर०—तूंच त्यांना विचार ह्मणजे सर्व कळून येईल. याबद्दल आतां व्यर्थ शंका कां धरतेस?

महा०—( कपिंजलास प्रणाम करून ) भगवन्, कोप न होईल तर थोडी विनंति आहे.

कपि०—तुमच्या मनांत जें असेल तें खुशाल विचारा.

महा०—भगवन्, हे आपले सन्निध तरुण पुरुष बसले आहेत हे कोणत्या ऋषीचे पुत्र व यांचें नांव काय? आणि त्यांनीं आपल्या कानांवर भूषणार्थ जी पुष्पमंजिरी ठेविली आहे, ती कोणत्या कल्पवृक्षाची आहे? अशा लोकोत्तर सुगंधाचा अनुभव मी पूर्वीं कधींच घेतला नाहीं ह्मणून माझ्या अंतःकरणास मोठें कौतुक वाटत आहे.

कपि०—( किंचित् हास्य करून ) बाले, हें तूं क-

शाला विचारतेस? यापासून तुला काय लाभ? तुला ऐकण्याचें कौतुकच वाटत असेल तर सांगतों ऐक—

पद. (सारंग, धुमाळी, धन्य उषाही बाणकन्य०)

धन्य मुनीवर श्रेष्ठ तपोनिधी वंद्य सुरादिक
सकलांसी ॥ श्वेतकेतु मुनि नामधेय जो
त्रिभुवनविजयी गुणराशी ॥ प्रफुल्ल कमलें
पूजन विधिला काढितसे तो कमलवनीं ॥
लोकोत्तर सौंदर्य पाहुनी मोहित कमला
देवि मनीं ॥ मुनिदर्शनसुख होतां निपजे
पुत्र सुलक्षण कमलाक्षी॥अंकावरतीं घेउनि
सातें अर्पि, ह्मणे तव सुत रक्षि ॥ १ ॥

तेव्हां त्या श्वेतकेतूनें, तो देवीनें दिलेला कुमार घेऊन, त्याच्या जातकर्मादि सर्व क्रिया केल्या. तो पुंडरीककमला पासून झाला ह्मणून त्याचें पुंडरीक असेंच नांव ठेविलें. नंतर कांहीं काळ गेल्यावर त्यास ब्रह्मचर्य व्रत देऊन, त्यानें त्यास संपूर्ण विद्या शिकविल्या, तो हा ऋषिकुमार.

महा०—(आपल्याशीं) एकूण यांची उत्पत्ति कमल वनांतील कमला--देवी पासून झाली, तरीच यांचें रूपतेज कमला प्रमाणें सुकुमार व तेजस्वी आहे. नाहींतर, तपश्चर्याकर्मांत काळ घालविणारे ऋषिजनांस असलें लोकोत्तर सौंदर्य असणार कसें! (कपिंजलास)

भगवन्, कर्णांवरील सुगंधीत पुष्पमंजिरी, या महाभागास कशी प्राप्त झाली, हें ऐकण्याची फार हौस आहे.

कपिं०—त्याच्या कर्णांवर जी ही पुष्पमंजिरी आहे, ती कल्पवृक्ष पारिजात नामक वृक्षाची आहे.

महा०— महाराज, समुद्रमंथनाचे वेळीं हा कल्पवृक्ष निघाला असून, त्या वृक्षाची मंजिरी यांस प्राप्त झाली ह्मणतां, याचें नवल वाटतें.

कपिं०—ती मंजिरी यास कशी प्राप्त झाली हें सांगतों ऐक—चतुर्दशी शिवतिथीचे दिवशीं, कैलास-पर्वतावर राहणारा जो अंबिकापती, त्याचे पुजनास्तव आह्मीं उभयतां नंदनवना जवळून जात असतां, नंदन-वनाची देवता पारिजात पुष्पाची मंजिरी हातीं घेऊन आली, आणि ह्या ऋषिकुमारास प्रणाम करून बोलली कीं, " हे भगवन्, हा अलंकार ह्या आकृतीस योग्य आहे, यास्तव कृपा करून ही पुष्पमंजिरी घ्यावी. " असें ती वनदेवता बोलत आहे तों, हा माझा सखा तिचे भाषणाचा अनादर करून तसाच चालता झाला; पण आपल्या मागें ती वनदेवता येत आहे असें जाणून, मी त्याला ह्मटलें. सख्या, ह्या वनदेवतेच्या प्रीतिदा-नाचा स्वीकार करण्यास काय दोष आहे? असें ह्मणून मी ती मंजिरी बळेंच ह्याच्या कानावर ठेविली. ती ही पुष्पमंजिरी.

पुंड०—( किंचित हास्य करून, महाश्वेतेस ) अग कौतुकवती, हा प्रश्न विचारण्याचा आयास, व्यर्थ तूं कशाला करतेस? जर हिचा सुवास तुला अति प्रिय-

कर असेल तर ही घे. ( असें ह्मणून आपलें कानाव-रील पुष्पमंजिरी काढून महाश्वेतेच्या कानावर ठेवितो. मंजिरी ठेवतेवेळीं महाश्वेतेच्या अंगाचा स्पर्श होतो, त्यामुळें मोहित होऊन आपल्याशीं ) अहाहा ! मी किती भाग्यवान् ! !

पद. (आर्या–आदिताल–शृंगा ताडोनी० )

स्पर्श सुखावि भारी । तनूतें । आनंदित
करिते । प्रेमें । मन्मानस हरिते । सुदती ।
हृदया रंजविते । परिते । स्पर्श सुखानें
मोहित झालों । कंपित तनू होते । तेणें ॥
आनंदित करिते । सुदती ॥ १ ॥

( मदनानें व्याकुळ होतो, त्यामुळें रुद्राक्षांची माळ गळून खालीं पडते, तों ती महाश्वेता मध्यंच झेलून घे-ऊन आनंदानें, )

महा०–( आपल्याशीं )

पद ( झिंझोटी–दादरा–तरी झाला दृष्ट माझ्या. )

स्पर्शसुखें हृदय ज्याचें मोहितही जाहलें ॥
करभागा कंप होतां प्रिय माला ती गळे ॥
॥ धृ० ॥ स्मृति नाहीं मालिकेची स्मरबाणें
वेधिलें ॥ ममकंठिं राहि आतां सखये गे
मालिके ॥ १ ॥

( असें ह्मणून रुद्राक्षांची माळ आपल्या गळ्यांत घालते, इतक्यांत छत्र धरणारी दासी माधविका प्रवेश करिते. )

माध०—( वंदन करून ) राजपुत्री, राणीसाहेबांचं स्नान होऊन मंदिरास जाण्याची वेळ झाली, तर आपण आपला स्नानविधी लवकर आटोपावा. अशी राणीसाहेबांची आज्ञा आहे.

महा०—( श्वास टाकून आपल्याशीं ) हाय हाय ! काय करूं, आतां मी या प्रेमसुखाला अंतरणार ना ? ( विचार करून ) असो, मातेच्या आज्ञेचं उल्लंघन करतां येत नाहीं. ( तरलिकेस ) बाई तरलिके, मातेच्या दर्शना करितां गेलं पाहिजे.

तर०—ठीक आहे चल. (असें ह्मणून जाऊं लागतात.)

पुंड०—( महाश्वेता गेलीसें पाहून दुःखानें श्वास टाकितो ) हाय हाय ! ! त्या सुंदरीच्या दर्शनसुखाला मी अंतरलोंना ! आतां मी आपल्या मनाचें शांतवन तरी कोणत्या उपायानें करूं ! ती सुंदरी केव्हां भेटेल !

( असें ह्मणून स्तब्ध डोळे मिटून बसतो. )

कपिं०—( पुंडरीक स्तब्ध बसलेला पाहून व प्रीतिकोप दाखवून ) सख्या पुंडरीका, प्राकृतजन ज्या मार्गानें जातात, तो मार्ग तुझ्यासारख्यास योग्य नाहीं. साधुपुरुषांचें धैर्य हेंच धन आहे, तर प्राकृतजनाप्रमाणें घाबरा कां झालास ? आणि धैर्य सोडणाऱ्या आपल्या अंतःकरणाचा निरोध कां करीत नाहींस ? तुझ्या इंद्रियांस आज हा अपूर्व विकार कोठून प्राप्त झाला, कीं

ज्या विकारानें तुझी हीं अशी अवस्था करून टाकिली आहे? अरे तें तुझें धैर्य कोणीकडे गेलें? तो तुझा इंद्रियांचा जय कोणीकडे गेला? तुझी ती अंतःकरण आवरण्याची शक्ति कोणीकडे गेली? तुझी ती अत्यंत शांतवृत्ति कोठें पळाली? आणि कुलकर्मानें प्राप्त झालेलें तें तुझें ब्रह्मचर्य कोठें गेलें? अरे तुझ्या हातांतून अक्षमाला खालीं गळून पडली; आणि ती तिनें नेली, हेंही तुला समजलें नाहीं. हें मोठें आश्चर्य! काय हो हा बशुद्धपणा! माळ तर नेलीच, पण तुझें हृदयही ती नीच स्त्री हिरावून नेत आहे, तें तरी मित्रा आतां आटोपून धर, जाउं देऊं नको.

पुंड०–( लज्जित होऊन ) कपिंजला, मजविषयीं तूं भलती शंका कां धरतोस? ह्या द्वांडग्या कन्येनें माझी अक्षमाला घेतली, हा तिचा अपराध मी कधींही सोसणार नाहीं ( असें ह्मणून बळेंच क्रोध आणून उठून आवेशानें महाश्वेतेस ) अगे चपल स्वभावे, माझी अक्षमाला मला दिल्यावांचून येथून पुढें जाशील तर खबरदार. ( असें ह्मणून महाश्वेतेच्या मुखाकडे पहात स्तब्द उभा राहतो. )

महा०–( आपले गळ्यांतील माळ काढून )–

श्लोक.

स्मर कुसुम शरानें मोहिलें मानसातें ॥
स्मृती सुख अनुतापें पावतें कीं लयातें ॥

प्रियकर करभागीं शोभवी नित्य माला ॥
ह्मणुनि तुज समर्पी इष्ट जी अक्षमाला॥१॥

( असें ह्मणून मोत्यांची माळ काढून पुंडरीकाच्या गळ्यांत घालते व आपण निघून जाते. )

कपिं०—सख्या पुंडरीका, असा स्तब्ध कां झालास, या स्थलीं राहण्याचा हा काल नव्हे. दिवस पहा किति वर आला—

पद. ( झुमाळी. )

उष्णानें हे तप्त होउनी मयूर तरुतळीं वसती॥
मृदु कर्णिकारकुसुमें भेदुनि भृंगाली वसताती॥
तप्ततटाका टाकुनि नलिनी सन्मुख हा आला॥
कारंडव पंजरस्थ शुक हा इच्छि तृपार्थ जलाला॥

( असें ह्मणून जातात. )

पहिला अंक समाप्त.

---

# अंक २ रा.

स्थळ—उपवन.

( नंतर मदनानें पीडित असा पुंडरीक प्रवेश करितो. )

पुंड०—( दुःखानें श्वास टाकून चिंतातुर होतो. )

पद. ( धनाश्री—धुमाळी—मी कुमार तीही कु० )

इंदुमुखी सुंदर रमणी या देहा कैशी मि-
ळते ॥ धृ० ॥ तिजवांचुनि न सुचे कांहीं
मन्मन हें तेणें झुरतें ॥ स्मरतापें पीडा त-
नुला फाराचि ती दुःसह होते ॥ चाल ॥
ही रजनी तापद होई । बहु कष्टें कंठुन
जाई । स्मरबाणें पीडा देहीं । सुख नाहीं
या जीवातें ॥ १ ॥

( दुःखानें श्वास टाकतो. ) हायहाय! त्या सुंदरीचें दर्शनाचा सुखानुभव मला पुनः घडेल काय ? त्या सुंदरीचें दर्शन झाल्यापासून माझें हें मूढ हृदय मला कांहींच सुचूं देत नाहीं! सदासार्वकाळ तिची ती सुंदर मूर्ती माझ्या नेत्रापुढें उभी राहते. तपश्चर्या—कर्म नष्ट झालें! ध्यानधारणा लयास गेली! मन आंवरून धरण्याची शक्ति अनिवार झाली! आतां काय करावें, हें मुळींच कळत नाहीं. ( मनाला उद्देशून ) हे मना, तूं

तरी एकाएकीं अविचारी कसें झालेंस ! ( विचार करून ) त्यांत त्याचा तरी काय दोष? कारण—

पद. ( कालिंगडा—दादरा. )

चंचल मन स्वाभाविक केवळ अविचारी
॥ धृ० ॥ नेत्रकटाक्षा मोहुनि जाई । स्पर्श
सुखोत्सुक अनुभव घेई । संगमसुख प्रिय
भारी ॥ चंचल० ॥ १ ॥

( अंमळ थांबून विचार करून ) मनाला तरी कां दोष द्यावा; कारण, या सर्वांना मुख्य कारण हा दुष्ट मदन आहे. ( मदनास उद्देशून ) हे कुसुमायुधा—

पद. ( मांड—धुमाळ. )

रति प्रियनाथा मज तापविशी । पुष्पमयी
वपु तव परि छळिसी ॥ धृ० ॥ तीक्ष्ण श-
रानें भेदिशि हृदया । शक्ति विगलिता
तेणें काया॥काय मी केला मंतु वद या॥
दुष्ट खरा तूं निर्दय होशी ॥ १ ॥

खरोखर या मदनावर व चंद्रावर विश्वास ठेवून कामीजन फसतात ना, हे चंद्रा ! तुला माझी दया येत नाहीं ना?

पद. ( षरज—कालिंगडा. )

व्यर्थ मला छळितोशी । हे निशीनाथा! हे
रतिनाथा अन्य जनांसम ॥ धृ० ॥ पुष्प-

**बाण तव वज्रासम अति ॥ शीत शशीकर तापद होती । दैवगती मज विपरित दसती ॥ १ ॥**

( असें ह्मणून स्तब्ध उभा राहतो. इतक्यांत कपिंजल येतो. )

**कपिं०**--( आपल्याशीं विचार करतो. ) माझा सखा पुंडरीक कुठें असेल बरं! अच्छोद सरोवरीं ज्या कुमारिकेचे दर्शनानें चित्त पराधीन झालें, त्या कुमारिकेच्या मागून गेला, किंवा ती गेल्यावर देहभानावर येऊन लज्जेनें माझ्या दृष्टीस पडूं नये ह्मणून कोठें लपून बसला, अथवा मी निष्ठुर शब्द बोललों, ह्मणून मजवर रागावून मला टाकून दुसऱ्या प्रदेशाकडे गेला, झालें तरी काय! ( श्वास टाकून ) त्याचा विरह मला कसा सहन होईल? सख्या पुंडरीका, कोठें रे आहेस! ( विचार करून ) आतां स्वस्थ बसून उपयोग नाहीं. मित्राचा शोध केला पाहिजे. ( असें ह्मणून इकडे तिकडे फिरतो व पाहतो इतक्यांत चिंताग्रस्त असा पुंडरीक दृष्टीस पडतो, त्यास पाहून ) हा पहा माझा सखा, ह्या शिलातलावर कसा स्तब्ध ध्यानस्थ बसला आहे. ( पाहून विचार करून ) हाय हाय! काय हा मनोविकाराचा असह्य वेग, कीं ज्याच्यायोगानें, एका क्षणांत ह्या ऋषिकुमाराची कष्टप्रद दशा झाली. असला हा ज्ञानराशी, कुमार ह्यानें एका क्षणांत व्यर्थ करावा काय! हा पुंडरीक लहानपणापासून स्वभावानें मोठा गंभीर, धीर, आणि अढळ मनाचा

होता, ह्मणून मला व इतर मुनिकुमारांस त्याचा स्वभाव फार आवडत असे, परंतु आज तर या मनोविकारानें ह्याच्या ज्ञानाचा पराभव करून, तपःप्रभावाची अवगणना करून, ह्याच्या गांभिर्याचें उन्मूलन करून, सामान्य मनुष्याप्रमाणें ह्यास अगदीं जडवत् करून टाकिलें. तस्मात् यौवनावस्थेंत चित्तवृत्ति स्थीर राहणें फार दुर्घट आहे. ( पुंडरीकाजवळ जाऊन )

पद. (वारी संकट हरी० )

**सखया कां उदास ऐसा होशी । स्तब्ध**
**उगा बसशी ॥ स्वमनीं काय अशी चिंता**
**करिशी । दुःखावश होशी ॥ सेवा तप**
**कर्मा त्यागुनि येशी । एकांतीं बसशी ॥ १ ॥**

( खांद्यावर हात ठेवून ) मित्रा मजकडे पहा तरी; हें तूं काय मांडलें आहेस?

पुंड०—( बराच वेळ दुःखानें मिटलेले डोळे मोठ्या कष्टानें उघडून व दीर्घ श्वास टाकून लज्जेनें ) सख्या कपिंजला, तुला सर्व वृत्तांत माहीत असून, मला व्यर्थ काय पुसतोस? ( पुनः स्तब्ध बसतो. )

कपिं०—( आपल्याशीं ) ह्या विकाराचा प्रतिकार होणें कठीण आहे. तरी असन्मार्गापासून मित्राचें यथाशक्ती सर्व प्रकारें निवारण करावें, असें वचन आहे. तरी ह्याचें शांतवन केलें पाहिजे. ( पुंडरीकास ) पुंडरीका, मला सर्व विदित आहे; पण मी तुला इतकेंच वि-

चारतों कीं, तूं जें हें आरंभिलें आहेस; ह्याचा उपदेश गुरूंनीं तुला दिला आहे, अथवा धर्मशास्त्रांत तूं ह्याचें पठण केलें आहेस, किंवा हा धर्म संपादनाचा उपाय आहे, किंवा तपश्चर्येचा एक प्रकार आहे, कां मोक्ष प्राप्तीची युक्ती आहे? हें काय आहे तें सांग. अरे हें तुला मनानें चिंतावयास तरी योग्य आहे काय? मग त्याप्रमाणें आचरण करण्यास योग्य कोठून असणार सांग बरें?

पुंड०–(दुःखानें दीर्घश्वास टाकून व कपिंजलाचे खांद्यावर हात ठेवून,) सख्या कपिंजला, कायरे सांगूं!

पद. (कानडा, त्रिताल.)

सतत तनू ही चिंता जाळी। सुख न गमे
बा देहास मुळीं॥ धृ०॥ मन्मथ खल हा
व्याकुळ करितो। मृगलांच्छन तो तापद
होतो॥ इंद्रियनिग्रह विकार हरितो॥
स्थैर्य धैर्यही जाई समुळीं॥ १॥

कपिं०–सख्या, अप्रबुद्ध पुरुषाप्रमाणें ह्या दुष्ट विकारानें उपहासास हा तुझा देह पात्रभूत केला असतांही तुला हें कसें कळत नाहीं? तूं विषयाचें तत्व जाणत असून कोणत्या कारणास्तव अशा अज्ञानांत शिरतोस? उन्मार्गानें जाणाऱ्या आपल्या इंद्रियांचें निवारण कां करीत नाहींस? अरे मनोविकार ह्मणजे पदार्थ काय, धैर्य धरून त्या दुष्टांची निर्भत्सना कर, केवळ तूंच त्यांच्या स्वाधीन होऊं नको.

पुंड०–( डोळ्यांचें पाणी आपल्या हातानें पुसून व कपिंजलाचा हात धरून ) कपिंजला,

पद. (धन्य उषा ही बाणकन्यका०)

इंद्रियनिग्रह सदुपदेश तव व्यर्थ असे या समयासी ॥ धर्म मार्ग तप व्रत नियमादिक काळहि जाई अस्तासी ॥ विषवेगाहुनी अति दुःसह ह्या कामविकारें सुमनासीं ॥ सौख्य नसे मन चंचल होतां काय कथूं मग दुःखासी ॥ १ ॥

सख्या कपिंजला, जो सदसद्विचार करावयास समर्थ असेल, ज्याला इंद्रियें असतील, किंवा ज्याला मन असेल त्याला तुझा उपदेश योग्य आहे; मला तर हें सर्व दुरापस्त आहे. कसे तरी यत्नावांचून धरिलेले प्राण मात्र अशा रीतीनें राहिले आहेत. मित्रा उपदेशाचा काळ फार दूर गेला, आणि धैर्य धरण्याची वेळही निघून गेली. हें मन आवरण्याचा काळही गेला. सांप्रत माझी स्थिती पाहिलीस का—

पद. ( मालकंस–त्रिवट. )

निशिदिनिं मजला चैन नसे कीं । दग्ध करी स्मर देह विलोकीं ॥ध्रु०॥ अंतस्तापें देहा वरती । ऊष्ण ऊष्ण हे अश्रू गळती । सर्वांगाची लाही होती । शीत शशीकर तापद पाही । सुगंध शीतल वायू वाही ।

चंदन लेपन सुख ना देई । प्राण जाइना एकाएकीं ॥ १ ॥

कपिं०—( आपल्याशीं ) हा फारच विरहाक्रांत झाला आहे, ह्याचें निवारण करून किंवा ह्यास उपदेश करून कांहीं फळ नाहीं, तर आतां ह्याच्या प्राणरक्षणाविषयीं प्रयत्न करावा. ( असें ह्मणून जवळच्या सरोवरांतून कमळांचे देंठ व पुष्पें वगैरे आणतो व त्याची शय्या करितो. ) मित्रा—

पद. ( शीवसमज नादान. वियारि० )

कमलदलें युतपुष्पित शय्या ॥ रम्य लतागृह सुखवी हृदया ॥ धृ० ॥ सुगंध शीतल रसगंधानें । कर्पुर कदली कर्पुर चूर्णें । ताप शमन वी समीरणानें ॥ १ ॥

पुंड०—( दुःखानें डोळ्यांत पाणी आणून कपिंजलाचे कंठास मिठी मारून ) प्राणसख्या कपिंजला—

पद. ( असावरी, त्रिताल. जाई परतोनी० )

प्राणसखा होशी । सखया ॥ मदन ताप संताप हराया । योजि उपायाशी । सखया ॥ धृ० ॥ दुष्ट प्रसंगीं प्रिय सुहृदाविण अन्य न उपदेशी । सखया ॥ हृदय जळे तनु दग्ध नेत्र गती शांत न होइ कशी । कुमार्ग वर्तन मार्ग निवारण कोण करिल

याशी । सखया ॥ बंधु सखा सुहृदादिक
तूं तरी त्यागुं नको, मजशीं ॥ १ ॥

( मूर्च्छित होतो. )

कपि०—( आपल्याशीं ) ह्या भगवान् कामदेवास असाध्य ह्मणून कोणतेंही नाहीं. पहा, पशु प्रमाणें वनांत राहणारा व स्वभावानें भोळसर, असा हा जन कोणीकडे, आणि नानाविध विलास-रसांची राशी, अशी ती गंधर्वराजकन्या महाश्वेता कोणीकडे? तिचा अभिलाष यानें धरावा काय! अहो, हें तप कोणीकडे आणि ही अवस्था कोणीकडे? ह्या संकटाचा प्रतिकार होणें अशक्य आहे. ह्या कालीं ह्याच्या प्राणरक्षणाकरितां कोणता उपाय करावा, कोणास शरण जावें, कोणत्या युक्तीनें हा माझा सखा पुंडरीक वांचेल! ( विचार करून ) आतां निष्प्रयोजन चिन्ता करीत बसणें व्यर्थ आहे. कोणत्या तरी उपायानें ह्याच्या प्राणाचें रक्षण केलें पाहिजे; आतां प्राणरक्षणाचा उपाय ह्मटला तर महाश्वेतेच्या समागमावांचून दुसरा कोणताच नाहीं. बरें हा आपण होऊन तिच्याकडे जाऊन आपला मनोरथ पूर्ण करील ह्मटलें तर ही गोष्ट अगदीं दुरापस्त आहे. त्यांतून हा त्याचा रोग तर कालातिक्रम करण्याजोगा नाहीं. आतां काय करावें! ( पुनः विचार करून ) हो सुचलें, थोरांचें ह्मणणें असें आहे कीं—

साकी. ( धुमाळ. )

लज्जास्पद अति निंद्य कर्मही आचरुनि
प्रिय करणें ॥ प्रिय सुहृदांचें जीवन रक्षण
नित्य करावें सुजनें ॥ ऐशी जन रीति ।
सांप्रत पुज्य असे मज ती ॥ १ ॥

बरें मी तिजकडे जातों, तिला तुझीही अवस्था कळवितों, असें ह्याला सांगून जावें तर, माझा मित्र मजकरितां अयोग्य व्यापार करण्यास प्रवृत्त झाला, असें समजून तो लज्जित होऊन कदाचित् माझें निवारण करील. असो, आतां महाश्वेतेकडे जाऊन, तिला हा सर्व वृत्तांत सांगून, माझ्या मित्राच्या प्राणरक्षणाचा उपाय योजला पाहिजे. ( पुंडरीकास ) सख्या पुंडरीका, आतां या ठिकाणीं स्वस्थ बसून काळ घालविणें हितकर नाहीं. चल आपले आश्रमीं जाऊं.

पुंड०—( सावध होऊन श्वास टाकून ) जशी तुझी मर्जी. ( दुःखानें उठून— )

पद. ( जोगी-धुमाळ—मजला वरील सु० )

हृदया दुर्लभ सुरकन्या ॥ जीव तळमळतो
॥ धृ० ॥ हृदया तीचा बहु हव्यास ॥
निशिदिनिं हृदयीं तीचा ध्यास ॥ प्रेमालिंगन सुख ही आस ॥ सखया खास
पुरेल कां ॥ १ ॥

( असें ह्मणून दोघेही निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ–अंतःपुर.

(तदनंतर मदनानें पीडित व दुःखानें व्याप्त अशी महाश्वेता पुष्प-शय्येवर पडली आहे व जवळ वसंतिका नामक तिची सखी तिची समजूत करीत जवळ बसली आहे.)

वसं०—(महाश्वेतेच्या तोंडावरून हात फिरवून व निरखून पाहून, महाश्वेते, सावध हो, असं काय करतेस?

महा०—(अमळ डोळे उघडून व दुःखानें दीर्घ श्वास टाकून,)

पद. (सजनि नटुनि प्रथम सभे०)

हाय हाय! काय दैव छळी स्मर भारी ॥
मदन बाण हरित मना असुख होतंगे बाई ॥
विकल काय काम करी ॥ धृ० ॥ निशिदिनिं
मज मुळीं न सुचत। सौख्य भोग ताप देत।
गान पान हीं न रुचत। विषसम तनु तळ-
मळ करी ॥ हाय हाय० ॥ १ ॥ प्रखर
बहुत पंचबाण। दुष्ट मदन अदय जाण।
काम नाम घेई प्राण। सुचत न मनीं बहु
हुरहुरी ॥ हाय हाय० ॥ २ ॥

सखे वसंतिके, त्या ऋषिकुमारावर माझं मन लुब्ध

झालं, हें सहन न होऊन, माझा छल करण्यास्तव मदनानें तर हा प्रयत्न चालविला नसेल ना! कायग सांगूं—

पद. ( तूं ही गरवाला दे. )

साहूं कशी या देहीं । मन्मन संथ न होई मुळीं । हृदया भूलि पडते । जीव अधीर वरी ही ॥ धृ० ॥ सखये कशी न या दया। अदय मदन हा त्रास देतसे । सकल तनू वरि लाही ॥ मन्म० १ ॥ अबला छळीतसे अरी । मदन कुटिल हा देह गांजितो । हृदया शांती नाहीं ॥ मन्म० २ ॥

वसं०—राजकन्ये, अशी घाबरी होऊं नको, आपल्या अविचारी मनाला विचार--बंधनानें, अंमळ आटोपून धर. ही पुष्पशय्या, ही चंदनाची सुगंधित थंड उटी, हीं कमलवनांतील रम्य कमलदलें यांचे सेवनानें आपल्या आत्म्याची शांती करून घे. नंदनवनांतील सर्व सुखें अनुकूल असतां, त्यांपासून देखील तुला ताप होतो, याला काय ह्मणावें?

महा०—( श्वास टाकून ) वसंतिके, मदनाचे योगानं त्या ऋषिकुमारावर माझी अत्यंत प्रीति जडल्यामुळं त्याचा तो ऋषिवेष, त्याचं तें यौवन आणि त्याच्या कर्णांवर पारिजात पुष्पांच्या मंजरीनं केलेला आश्रय, यापेक्षां हे सर्व शीतलोपचार मला अगदीं तुच्छ वाटतात. त्याच्या विरहानं आतुर झालेल्या माझ्या प्राणाचं रक्षण

करण्याकरितां, मी तुला सांगतें कीं, ती माझी प्रियकर रुद्राक्षमाला माझे गळ्यांत घाल; आणि ती पारिजात पुष्पमंजरी माझ्या कानावर ठेव. त्याच्या योगानं मला सुख होईल.

( वसंतिका रुद्राक्षमाला तिचे गळ्यांत घालते व पारिजात पुष्पांची मंजरी तिचे कानांवर ठेवते. इतक्यांत तरलिका प्रवेश करिते. )

तर०—राजकन्ये, तूं धन्य खरी. सावध हो, आणि मी काय सांगतें हें नीट लक्ष लावून ऐक. तुझ्या मनांतील हेतू सिद्धीस जाण्याचा समय अगदीं जवळ आला आहे.

महा०—( अंमळ सावध होऊन, तरलिकेस ) अग तरलिके, जी गोष्ट मनाला देखील असाध्यशी वाटते, ती तूं साध्य होईल ह्मणतेस, हें होईल तरी कसं !

तर०—राजकन्ये, ऐक तर खरी, जे दिव्य आकाराचे दोघे ऋषिकुमार अच्छोद सरोवराच्या तीरावर आपण पाहिले, त्यांतील एक, ज्यानं तुझ्या कानावर कल्पवृक्षाच्या पुष्पांची मंजरी ठेविली तो दुसऱ्या ऋषिकुमाराची दृष्टि चुकवून पुष्पित लतांच्या दाटींमधून येऊन मी पाठीमागून येत आहे असं पाहून तुला उद्देशून त्यानं मला विचारलं कीं—

महा०—( उठून मध्येंच उत्सुकतेनें ) सांग बरं त्यानं तुला काय विचारलं तें ?

तर०—त्यानं मला असं विचारलं कीं, “ अगे बाले जिच्या बरोबर तूं आली होतीस ती कन्या कोण,

ती कोणाची, तिचें नांव काय, आणि ती कोठें जात आहे ? ”

महा०—( आनंदानें ) बरं मग तूं काय उत्तर दिलंस ?

तर०—मीं त्यास सांगितलं कीं, चंद्रकिरणापासून उत्पन्न झालेली जी गौरी नामक अप्सरा तिजपासून झालेली; आणि जो गंधर्वांचा मुकुटमणि हंस नामा गंधर्वराज त्याची ही कन्या होय. हिचं नांव महाश्वेता, व गंधर्वांचं स्थान जो हेमकुट पर्वत, त्याजवर ही जात आहे.

महा०—बरं मग तो ऋषिकुमार काय ह्मणाला ?

तर०—असं माझं भाषण ऐकून तो मनांत कांहीं चिंतन करीत क्षणभर उगाच उभा राहिला.

महा०—मग पुढं ?

तर०—नंतर कांहीं वेळानं, निश्चल दृष्टीनं मजकडे पाहून व उत्कंठा प्रदर्शित करून मला पुनः ह्मणाला “ अग बालिके; तुझी मुद्रा फार सौम्य दिसते, ह्यावरून तूं गुणवती आहेस व स्थीर मनाची आहेस, असा भास होतो, तर एखादी गोष्ट मी तुजपाशीं प्रार्थनापूर्वक बोलत असतां ती ऐकून घेऊन त्याप्रमाणें तूं करशील असें वाटतें. ”

महा०—असा कोणता कार्यभाग त्यानं तुला सांगितला ? आणि मग तूं काय उत्तर दिलंस ?

तर०—असं त्याचं भाषण ऐकून मी मोठ्या नम्रतेनं हात जोडून आदरपूर्वक बोललें कीं, भगवन्, असं

कां ह्मणतां? मी कोण, मी ह्मणजे पदार्थ काय? आपणांसारखे जगत्पूज्य महात्मे, आपल्या पवित्र दृष्टि आह्मांसारख्या क्षुद्र मनुष्यांवर पाडतात तरी काय? मग आज्ञा तर कोठून करणार? तर आपलं जें काय कार्य असेल तें निःशंकपणानं मला सांगावं, आणि हाच या जनांवर अनुग्रह करावा.

महा०—नंतर तो ऋषिकुमार काय बोलला?

तर०—असं मी बोलल्यावर तो ऋषिकुमार संतोष पावून आनंदानं मजकडे बघूं लागला. नंतर जवळच एक तमालवृक्ष होता त्याचा कोमल पल्लव काढून शिलातलावर तो चुरडून, त्याचा रस काढून, त्या रसानं आपल्या उत्तरीय वल्कलाच्या पदराची पट्टिका फाडून काढून, तिजवर आपल्या करंगळीच्या नखाग्रानं कांहीं लिहून " ही पत्रिका तूं त्या कन्यकेला एकांतीं एकटी पाहून तिच्या हातीं द्यावी, " असं बोलून, त्यानं ती माझ्या हातांत दिली; ती मी आणली आहे, ही पहा. ( असें बोलून तांबुलपात्रांतून ती पत्रिका काढून महाश्वेतेस दाखविते )

महा०—( मोठ्या आनंदानें उठून बसते, व ती पत्रिका पाहून उत्सुकतेनें ) शाबास तरलिके, आण पाहूं ती पत्रिका मला एकदां तिला प्रेमानं पाहूं दे! ( पत्रिका हातीं घेऊन व निरखून पाहून ) किती मी भाग्यवान्! कीं ऋषिकुमार संबंधी जो आलाप दासीच्या मुखानं निघाला तो केवळ शब्दमय असतांही अंतःकरणांत स्पर्शसुखच करीत आहे काय, असं वाटतं. (पुनः

आनंदानें निरखून पाहून ) सखे वसंतिके, या पत्रिकेचा आभिप्राय काय असावा बरं !

वसं०—अग इष्ट गोष्ट प्राप्त व्हावी हाच हेतू, हें तूं कसं जाणत नाहींस? वाच ह्मणजे सर्व कळून येईल. उगीच आशंका कां करतेस?

महा०—एक तर मी वाचतें ( असं ह्मणून पत्रिका निरखून पाहून आनंदानें )

पद. ( मालकंस—त्रिताल )

" विलसित मुक्ताहारें लागुनि ॥ हंस विहग
जो जाई भुलुनि ॥ ध्रु० ॥ तद्वन्मानसजन्मा
तत्सम । गौरवर्ण जी तूं, त्या हरुनी ॥
दूरवरी त्या जाशी घेउनी " ॥ १ ॥

वसं०—सखे तूं भाग्यवान् खरी, कारण तुझ्या मनांतील हेतू पूर्ण होण्याची वेळ अगदीं जवळ आली, मात्र तुझी इच्छा असली ह्मणजे झालें.

महा०—( आपल्याशीं आनंदानें ) देवा ! माझे मनोरथ पूर्ण होतील का? जी गोष्ट अप्राप्य ती प्राप्त होण्याची इच्छा धरणं व्यर्थ आहे. हे कुसुमायुधा ! हे भगवन् रोहिणीपते ! तुह्मी आतां किती अंत पहाणार? ( तरलिकेस जवळ घेऊन व तिचे आंगावरून हात फिरवून उत्सुकतेनें ) बाई तरलिके, तूं भाग्यवान् खरी, कारण कीं, तुला त्या महाभागाचं दर्शनसुख पुनः झालं. अग तरलिके, सांग बरं तो ऋषिकुमार तूं कसा पाहि-

लास, आणि त्यानें तुझ्याशीं काय काय भाषण केलें? तूं त्याजपाशीं किति वेळपर्यंत होतीस, आणि तो कोठ पावेतों आपल्या मागून आला?

तर०—राजकन्ये, आतांच तुला मी सर्व वृत्तांत सांगितलाना! वेड्यासारखी पुनः पुनः तेंच तेंच काय विचारतेस? अशी भ्रमिष्ट कां झालीस?

वसं०—अग तरलिके, आपण किती जरी बोललों तरी तिचें चित्त ठिकाणावर आहे कुठें? त्या ऋषिकुमारा शिवाय तिला कांहींच सुचत नाहीं!

महा०—सखे वसंतिके, तूं ह्मणतेस तें खरं; पण मी तरी काय करूं! हें दुष्ट मन माझ्या स्वाधीन मुळींच राहत नाहीं.

पद. (मोरि इतनी अरज.)

प्रिय वियोग छळितो सुख नाहीं मला ॥
विरहें न रुचे सखे कांहीं मला ॥ धृ० ॥
जो मन्मनाचा असेचि विसांवा गे ॥ त्याविण
असुखी सदैव ताप मला ॥ प्रिय० ॥ त्या
रूपतेजें भुलोनी विनोदानें ॥ हारही कंठीं
समर्पिला मजला ॥ प्रिय० ॥ मुनिदर्शनानें
गमे मना सुख गे॥ साहुं कशी मी वियोग-
जन्य हला ॥ प्रिय० ॥ १ ॥

(इतक्यांत छत्र धारणकरणारी एक दासी प्रवेश करिते.)

दासी—(महाश्वेतेस) राजकन्ये, त्या ऋषिकुमारा

पैकीं एक ऋषिकुमार आपल्या राजवाड्याच्या दरवाजापाशीं येऊन उभा राहिला आहे; आणि "रुद्राक्षमाला मागावयास मी आलों आहे." असं ह्मणतो. ह्यावर जशी आपली आज्ञा होईल त्या प्रमाणं. (असें ह्मणून स्तब्ध उभी राहते.)

महा०--(ऐकून व मोठ्या आनंदानें एकदम उठून) अग जा, त्यांना अगोदर इकडे घेऊन ये. (आपल्याशीं) देवा, मी ज्यांच्या कारितां इतकी काळजी वहातें, ते तर हे नसतील ना! हे वेड्या मना, अंमळ धीर धर, धीर धर!--

पद. (सदाशिव धुंदी.)

मना हळहळशी । अधिर कां असें मज कारिशि । उगीच बा छळिशि ॥ धृ० ॥
त्यागुनि देई चिंता भ्रांती । सावध हो [illegible]
घेशी ॥ मना० ॥ तव सुमनोरथ सिद्धहि होईल ॥ शांति-सुखातें वरिशि ॥ मना० १ ॥

तर०--(कपिंजलास येतांना पाहून) महाश्वेते, जसं रूपास अनुरूप यौवन, यौवनास अनुरूप मदन, मदनास अनुरूप वसंत; आणि वसंतास अनुरूप दक्षिणवात, तसा त्या ऋषिकुमाराला अनुरूप असा त्याचा सखा कपिंजलनामक दुसरा ऋषिकुमार तो येत असावा असं वाटतं.

वसं०--(कपिंजलाकडे पाहून) तरलिके, ऋपिजना-

ची चित्तवृत्ती सदां शांत असते, असं असतां; ह्याच्या मुखावर खिन्नतेची छाया दिसते याचं कारण काय असावं बरं ?

तर०–आतां सर्व कळून येईल.

( इतक्यांत दासीच्या मागून कपिंजल प्रवेश करतो. कपिंजल आलासें पाहून सर्वजणी उठतात. )

महा०- (प्रणाम करून) भगवन्, या दर्शनानं या जनावर हा अनुग्रहच झाला. (आसन देऊन) या आसनावर बसावं. (कपिंजल आसनावर बसतो, व कांहीं एकांतीं बोलावयाचे इच्छेनें जवळ असलेल्या तरलिका, व वसंतिका यांचेकडे एकसारखा पाहूं लागतो.)

महा०–( कपिंजलाचे पाहण्याचा अभिप्राय जाणून ) भगवन्, ह्या दोघी माझ्या शरिराहून निराळ्या नाहींत, तर आपणांस जें काय बोलावयाचं असेल तें निःशंकपणानं बोलावं.

कपिं०–(दुःखानें श्वास टाकून) राजकन्ये, काय सांगूं ? माझी वाणीच लज्जेनें बोलण्यास धजत नाहीं. पहा, कंदमूल फळें भक्षून वनांत राहणारा, शांतचित्त, तपोनिष्ठ असा ऋषिजन कोणीकडे ! आणि मलिन, कामुक अशा जनांनीं ज्याचा अंगिकार केला, असा प्रपंच कोणीकडे ? परंतु पहा दैवानें काय आरंभिलें आहे तें. मला वाटतें, हा ईश्वर लोकांस कदाचित् यत्नावांचूनही उपहासास पात्र करतो. मला कळत नाहीं कीं, हें आचरण वल्कलांस योग्य आहे, किंवा जटांस योग्य आहे, किंवा तपश्चर्येस योग्य आहे, अथवा हें धर्मोपदेशाचें अंग आहे !

अशी विटंबना मी पूर्वी कधींही पाहिली नाहीं. ह्मणूनच मला धीर करून काय सांगावयाचें, ते सांगितलें पाहिजे; कारण सांगण्या वांचून दुसरा उपाय दिसत नाहीं. न सांगितलें तर मोठा अनर्थ होणार आहे.

महा०–महाराज, असं संकट तरी काय आहे कीं, ज्यामुळं अनर्थ होणार ह्मणतां !

कपिं०–सांगतों ऐक.–मी त्यावेळेस तुझ्या समक्षच मोठ्या कोपानें व निष्ठुरपणानें आपल्या मित्रास काय जें बोलावयाचें बोललों, तें तूं ऐकिलेंच असेल. मला वाईट वाटल्यामुळें मी अंमळ त्याला सोडून दुसरीकडे गेलों. नंतर तूंही तेथून गेलीस असें समजून, हा एकटाच तेथें काय करतो हें पहाण्या करितां माघारा फिरून, एका झाडाच्या आड उभा राहून; त्या स्थळाकडे पाहूं लागलों. तों माझा मित्र तेथें दिसेना, त्यावेळीं माझ्या मनांत अनेक तर्क आले. मला वाटलें कीं हा काय, याचें चित्त पराधीन झाल्यामुळें तुझ्या मागोमाग गेला, किंवा तूं गेल्यावर देहभानावर येऊन लज्जेनें दृष्टीस पडूं नये ह्मणून कोठें लपून बसला, किंवा मजवर रागावून अन्यस्थळीं गेला, असें मनांत येऊन मी सर्व प्रदेश शोधला; परंतु ठिकाण लागेना. मग जवळच—

पद. ( नित्य उठुनि घरीं कुरकुर करितां० )

**रम्य लता घनदाट तरूवर पुष्पित शोभति घोरवनीं ॥ सुगंध शीतल वायू सुखवी**

भ्रमरसंघ भर कमलवनीं ॥ लताविटप हे पुष्पित होती शीतल छाया पाहोनी ॥ रम्य शिलातल आसन केलें चित्रितसा अति स्तब्ध मनीं ॥ तेजरहित मुख पांडुरसा वरी जलबिंदू पुर ये नयनीं ॥ दीर्घ श्वासें कंपित काया दुःखि दिसे तो बहुल मनीं ॥ १ ॥

महा०—(त्याचे मनांतील हेतू ओळखण्याकरितां मुद्दाम विचारते.) भगवन्, अशा कोणत्या विकारानें त्यांची अशी कष्टमद दशा झाली? तपोवनांत राहणाऱ्या तपस्वीजनांच्या शांत मनास असा विकार होणें हें अयोग्य आहे!

कपिं०—राजकन्ये, या सर्व मनोविकाराला कारण मदन, मदनास यौवन व यौवनास, स्त्रीरूप हें होय. मनोहर स्त्रीसौंदर्य जर माझ्या मित्राच्या प्राणहरणाला कारण झालें नसतें, तर त्याची ही अशी अवस्था कां झाली असती? भवितव्यता प्रबळ असल्यामुळें ह्मणा, किंवा त्याच्या दैवाच्या दुष्टत्वामुळें ह्मणा, अथवा अशा क्लेशाचे अनुभव त्याला व्हावयाचे होते ह्यामुळें ह्मणा, त्याची अशी स्थिति झाली. कोणाशीं बोलत नाहीं, पहात नाहीं व ऐकत नाहीं. मौक्तिकमाळा आपल्या उराशीं धरून स्तब्ध बसतो, जणों निद्रित, किंवा समाधिस्त, भूतग्रस्त किंवा मूर्च्छित, अशी त्याची स्थिति झाली आहे. त्याचें मन स्थीर करण्यासाठीं त्याला पुष्कळ बोध केला, त्याला शास्त्रांतील दृष्टांत ह्मणून द्या-

खविले, त्याची प्रार्थना तर केली, त्याचें आर्जव तर केलें, परंतु तें सर्व फुकट झालें !

महा०—भगवन्, इतकी त्याची स्थिति झाली, तरी त्या दुष्ट मदनाला त्याची दया आली नाहींना ! बरं मग ?

कपिं०—नंतर प्राणरक्षणाचा उपाय ह्मटला तर महाश्वेतेच्या समागमा वांचून दुसरा कोणताच दिसेना. शेवटीं त्याला न कळवितां, मित्राचें रक्षण व्हावें ह्मणून, अन्य मिष करून मी तुजकडे आलों आहे; आणि त्याची अवस्था मी तुला कळविली आहे. ह्या उपर जें ह्या काळास उचित असेल, जें अशा प्रेमास योग्य होईल, ज्याच्या योगानें माझ्या येण्यास मान दिल्या-सारखा होईल, जें आपणांस उचित असेल आणि ज्याच्या योगानें माझ्या मित्राचे प्राण वांचतील तें कर-ण्याविषयीं तूं समर्थ आहेस. ह्याहून अधीक कांहीं माझ्यानें बोलवत नाहीं. (असें ह्मणून महाश्वेता काय उत्तर देते याची वाट पाहत स्तब्ध बसतो.)

महा०—(आनंदानें डोळ्यांतुन अश्रु वहात असतां आपल्याशीं) अहाहा! मी किती भाग्यवान्!! हा बोलतो त्याप्रमाणें त्याची अवस्था असल्यास, दैवाची करणी विपरीतच ह्मणावयाची ! (थांबून विचार करून) ह्या विकारानें जसं मला तसं त्यालाही परवश केलंना ? तेव्हां हा विकार संताप देत असूनही मला अनुकूल आहे. ह्यांत कांहीं संशय नाहीं, आणि जर खरीच त्याची अशी अवस्था झाली असेल, तर ह्यानं मजवर मोठाच उपकार केला ह्मणावयाचा. ह्या कपिंजल मुनीची

आणी खोटी ह्मणतां येत नाहीं, कांकीं ज्याची आकृति शांत, अशा पुरुषाच्या मुखांतून खोटं वचन निघेल तर कसं? बरं पण अशा प्रसंगीं मी तरी काय उत्तर देऊं!

(असें ह्मणून विचार करीत बसते, इतक्यांत द्वारपाल घाईनें प्रवेश करितो.)

**द्वार०**–(महाश्वेतेस) राजकन्ये, तुझी प्रकृति बिघडली आहे, असें परिजनाच्या मुखानें ऐकून, महाराणी विलासमंदिरीं तुझ्या समाचाराकरितां निघाली आहे, तर ह्या स्थलीं स्वस्थ न बसतां तिकडे जाण्याची त्वरा करावी.

**कपिं०**–(परिजनाच्या दाटीस भिऊन व सत्वर उठून, महाश्वेतेस) हे राजकन्ये, आतां मी येथें थांबलों असतां फार उशीर होईल, आणि सूर्यनारायणही अस्तास चालला, तर आतां मी जातों. तूं सर्व प्रकारें आपल्या इष्टजनाच्या प्राणाचें रक्षण कर, हीच दक्षिणा मागावया करितां हा मीं तुला अंजली जोडला आहे; हीच माझी संभावना. (असें ह्मणून प्रत्युत्तराची वाट न पाहतां त्या दाटी मधून युक्तीनें, घाईघाईनें निघून जातो.)

**वसं०**–सखे महाश्वेते, मातेचे दर्शनास लवकर गेलं पाहिजे; आतां या ठिकाणीं फार वेळ घालविणं चांगलं नाहीं. तुझी माता तिकडे वाट पाहत असेल. तर चल.

(असें ह्मणून सर्वजणी उठतात.)

**महा०**–(दुःखानें श्वास टाकून,) तरलिके, तुला

हें कसं कळत नाहीं? माझं हृदय अत्यंत व्याकूळ झालं आहे, इंद्रियं विव्हल झालीं आहेत, आतां पुढें काय करावं हें मला कांहींच समजत नाहीं. तर ह्या प्रसंगीं जें योग्य असेल, त्याचा तूं मला उपदेश कर. तो कपिंजल तुझ्या समक्षच काय बोलून गेला तें तूं ऐकलंच आहेस. जर मी इतर कन्येप्रमाणं लज्जा व धैर्य टाकून, सदाचाराचा अतिक्रम करून, कुलाची अवगणना करून, लोकापवादाचं भय सोडून, पित्याची अनुज्ञा व मातेचं अनुमोदन न घेतां त्याकडे जाऊन त्याजकडून आपलें पाणिग्रहण करवीन तर, गुरुजनाची अमर्यादा केल्यामुळं मोठा अधर्म होईल. बरं मृत्युपथाची वाट धरावी, तर प्रथम हाच दोष कीं, आपण होऊन इकडे आलेल्या कपिंजल ऋषीचा मनोभंग मी केला, असं होईल. बरं त्या जनाचा आशाभंग केल्यामुळं त्यांस मरण प्राप्त झालं, तर ऋषिजनाच्या वधाचं महापाप माझ्या मस्तकीं येईल. आतां कायग करूं!

(असें ह्मणून तरलिकेच्या अंगावर अंग टाकते.)

तर०—(अंगावरून हात फिरवून) राजकन्ये महाश्वेते, सावध हो; हें तूं काय आरंभिलं आहेस? तूं कांहीं इतकी अधीर होऊं नको कांहीं विचार कर.

महा०—तरलिके, आतां विचार करण्याचा हा काळ नव्हे. तूं सांगतेस तें सर्व खरं पण मी काय करूं?

पद. (आपसोसके आखोंसे०)

सहवास सदां साचा सुखाचा मला होई ॥
वनभागीं वसे तो ह्मणोनि मनीं लाही ॥ धृ० ॥
बहु सुंदराकृतिनें सखे मन मोहिलें पाही ॥
विरहानळें झुरतें करावें कसें बाई ॥ १ ॥
प्रिय माळ ती मुनिवेष तो मजला सुखा
देई ॥ मधुभाषणें वदतां मनासीं बळें नेई ॥ २ ॥
जग शून्य हो मज त्याविणें जड देहही होई ॥
न सुचे सखे मातें जिवाची आशा नाहीं ॥ ३ ॥

(असें ह्मणून मूर्च्छित पडते.)

तर०–(पदरानें वारा घालून) भर्तृदारिके, सावध हो आतां. उगीच लज्जा कशाला धरतेस आणि त्या गुरुजनाची तरी अपेक्षा कां बाळगतेस? प्रसन्न हो आणि मला तिकडे पाठीव. मी त्या तुझ्या हृदयांत वास करणाऱ्या प्रियजनाला घेऊन येतें, कांहीं काळजी करूं नको. जर तुला धीर धरवत नसेल तर, तूंच तिकडे चल. आतां या वृद्धिंगत झालेल्या विकाराचें सहन करण्यास इतःपर तूं समर्थ नाहींस. उठ उठ! आतां उशीर करूं नको.

वसंति०–सखे महाश्वेते, तरलिका काय सांगत आहे इकडे जरा लक्ष दे. कांहीं मनाला आटोपून धर. असं काय करतेस? हा चंद्रमा पहा उदयाचलीं येत चालला आहे. त्याचे शीतकर तुला सुखदायी होवोत. तिकडे तुझी माता वाट पहात असेल.

महा०–( तरलिकेचा हात धरून मोठ्या कष्टानें हळू हळू उठते. ) बायानों, तुह्मांला जें वाटेल तें तुह्मी सांगतां, त्यांत तुमचा कांहींच अपराध नाहीं. मी पुष्कळ प्रयत्न करतें; पण हें माझं मूढ हृदय मला कुठं चैन पडूं देत आहे! या आकाररहित इष्टवासनेचा विकार झाल्यामुळं तें असह्य होऊन, त्याचा प्रतिकार करणं आतां असाध्य आहे. त्यांतून सर्व विकल्प वालविणारा, लज्जेचं उन्मूलन करणारा, आरण होऊन अभिगमन करणाऱ्या दोषांवर माती लोटणारा, आणि कालातिक्रम सहन न करणारा, असा जो हा दोषाकर चंद्र, तो मला सुख कसं बरं होऊं देईल! तो तर मला माझ्या प्रियजनाकडे न नेतां उलटा मृत्युपथाची वाट दाखविण्यास तयार आहे. ( अंमळ थांबून तरलिकेस ) बरं चल तर आतां, माझं जीवित आहे तों पर्यंत कष्टप्रद अवस्थेत पडलेल्या त्या मुनिकुमाराला आपण कसं तरी जाऊन भेटूं ( असें ह्मणून मोठ्या कष्टानें तरलिकेचा हात धरून उठून उभी राहते. इतक्यांत उजवा डोळा लवलासें दाखवून दुःखानें दीर्घश्वास टाकते. ) हाय हाय! आतां काय करूं!! या मेल्या नेत्राला हीच वेळ फावली. काय दैवगती विलक्षण आहे पहा! ज्या ज्या सुखदुःखाच्या गोष्टी, पुढं होणार असतात, त्या त्या प्रमाणं त्यांचीं चिन्हें अगोदरच होत असतात, असं ह्मणतात तें कांहीं खोटं नाहीं. ( आकाशाकडे पाहून श्वास टाकून ) देवा! या पुढं आणखी कोणकोणतीं संकटं मजवर येणार आहेत!!!

तर०—राजकन्ये, या चंद्रप्रकाशाचे शुभ्र कांतीनं भूमंडळाचा मध्य प्रदेश बराच व्यापून टाकिला. चांदिणं चोहोंकडे पसरल्या मुळं सर्व लोकांस अत्यंत सुख होऊन, आपण चंद्रदर्शनाच्या सुखाचा अनुभव घेत आहों काय असं त्यांस वाटत आहे. सूर्यविकासिनी कमलं मिटूं लागलीं. हीं पहा, चंद्रविकासी कमलं त्याच्या तेजानं प्रफुल्लित होत चाललीं. किती हा रमणीय देखावा दिसत आहे!

वसं०—सखे महाश्वेते, रात्र बरीच झाली. तिकडे तुझी माता काय ह्मणेल? चंद्रोदय झाला पहा—

पद. (भूपकल्याण—दादरा)

धवल प्राचि सुचवि इंदु ॥ पूर्ण सुधासार सिंधु ॥ धृ० ॥ मंद मंद गंध वाहत । वनशोभा रम्य दिसत । आनंदित सकल दिसत । सुखदायी होइल गे ताझये मुखेंदु ॥ धवल प्राचि सुचवि० ॥ १ ॥

(सर्व निघून जातात.)

दुसरा अंक समाप्त.

# अंक ३ रा.

## स्थळ— अरण्य.

( पडद्यांत ) अहो मृगया करणारे लोकहो ऐका—

श्लोक.

आला वेगें हरिण बघ हा दीर्घ उच्छ्वास
टाकी ॥ पाही रागें हळुच वळुनी धांवतां
मार्ग टाकी ॥ आला आला गहन विपिनीं
जाइ सेना ह्मणोनी ॥ धांवा पाठीं त्वरित
वनिं हा गुप्त होई ह्मणोनी ॥ १ ॥

वास्तव सर्व अरण्यास चोहोंकडून वेढा द्या आणि—

श्लोक.

सेना पारधि लोक सर्व दवडा उत्कृष्ट का-
मांत या ॥ जाळीं सर्व वनीं बहूत पसरा
श्वानांस सोडोनियां ॥ वाटा बंद करा शरा-
सह बसा योजोनियां नेम हो ॥ हातीं घेउनि
दंड सर्व उसळा कोलाहलें रान हो ॥ २ ॥

( तदनंतर गळ्यांत रुद्राक्षमाला घालून व कानांवर पुष्पमंजरी ठेवून अभिसारिकेचा वेष घेतलेली, अशी महाश्वेता तरलिकेसह प्रवेश करिते. )

महा०—( दुःखानें दीर्घ श्वास टाकून व तरलिकेचे खांद्यावर हात ठेवून. )

पद. ( क्या कलम खुदानें मारा० )

**बहु दुष्ट मदन हा बाई निज तेजें पीडा देई ॥ छळि अबला निष्ठुर मेला जीव कसा व्याकुळ होई ॥ विरहानळ जाळी मातें काय करूं दुःसह होई ॥ चाल ॥ सुंदरा कृतीनें मजशीं । भुल-वूनि टाकि हृदयाशीं ॥ त्या योगें सुख ना होत । ताप बहु देत । जीव ना जाई । मन्मथ खल निर्दय पाही ॥ १ ॥**

तर०—( महाश्वेतेस ) महाश्वेते, सूर्यबिंब अस्त पावल्यामुळें, या सर्व दिशांचीं मुखें कशीं मलीन व निस्तेज झालीं आहेत. अंधःकार पडल्यामुळें मार्ग देखील दिसत नाहीं, त्यांतून हा घोर वनांतील रस्ता फारच अवघड आहे; ह्मणून तुला सांगतें कीं, अंमळ जपून चाल.

महा०—तरलिके, प्रियजनाकडे अभिसरण करण्यास जो स्त्रीजन प्रवृत्त झाला, त्याला याची मुळींच काळजी नसते; मग भीति कुठून असणार? कारण हा पहा मदन, आपलें धनुष्य सज्ज करून माझ्या बरोबर वाट दाखवीत चालला आहे. पायांस लाविलेला अळित्याचा रंग हाच कोणी पुंडरीकाविषयींचा प्रेमा, तो पाय निसरूं न देतां मला संभाळीत आहे. तरलिके, तो प्रिय पुंड-

रीक मला भेटून माझी इच्छा पूर्ण करील काय? मला तर त्याच्या वांचून एकेक क्षण युगासारखा भासतो.

पद- (हिज्रसनमे जिंदगी०)

विरहानळें ही पोळते काया सखे अहा! ॥
साहू कशी मी या शरीरीं फार ताप हा॥ धृ ० ॥
ध्यास मज लागे तयाचा मन हें सदां हरी ॥
जीव अतिशय कालवे हा शांती न ही वरी ॥
अनिवार मजला शोक हा सोसे न हा पहा ॥ १ ॥
सुंदराकृति पाहुनीयां मन मोहिलें कसें ॥
सौख्य न मना थोर चिंता मज लागलें पिसें ॥
परिणाम होतां गोड हो चिंता सखे महा ॥ २ ॥

तरलिके, हा संताप देणारा चंद्रमा माझ्या प्रमाणं त्या पुंडरिकास आपल्या करांनीं आकर्षून माझ्याकडे आणील का ग?

तर०—(किंचित हांसून) राजकन्ये, तूं काय वेडी आहेस, ह्या चंद्राला त्या जनाचा काय उपयोग आहे? पहा याची दशा काय झाली आहे ती. कामी जनां प्रमाणं ह्याचे शरीर कसं फिक्कं व निस्तेज झालं आहे, व स्फटिक मण्याच्या जमिनीवर ह्याचं प्रतिबिंब पड-ल्यामुळं हा आडखळून खालीं पडत आहे काय, असं वाटतं. ह्या कमलवनांत चक्रवाक पक्षांच्या जोड्यांची फाटाफूट झाल्यामुळं पहा ह्यास किती वाईट वाटत आहे.

महा०—तरलिके, आतां इथून तें स्थळ किती बरं लांब आहे?

(पुढें जातात तों अकस्मात् रडण्याचा स्वर ऐकूं येतो.)

तर०—( एकदम थांबून व ऐकल्सें करून ) महाश्वेते ऐक. या सरोवराच्या पश्चीमतटाकडून करुणस्वर येत आहे, हें काय बरं असावं ?

महा०—( एकदम स्तब्ध होऊन कान देऊन ऐकतात ) खरंच.

( इतक्यांत पडद्यांत दु:खानें, )

" हायहाय ! ! काय हें अकस्मात संकट आलें, हें काय झालें, हा प्राणसख्या पुंडरीका ! ! "

महा०—( मनांत भिऊन आपल्याशीं ) हा काय प्रकार असेल ? माझा उजवा डोळा लवला, तेंव्हांच माझ्या मनांत भलभलते विचार येऊं लागले; आणि आतां तर मी हा प्रत्यक्षच अनुभव घेत आहें. कांहीं असो ( तरलिकेस ) तरलिके, हें काय बरं आहे ? हा करुणस्वर कोणाचा असावा बरं ? चल अंमळ पुढें होऊन ऐकूं ( असें ह्मणून कांहीं पावलें पुढें जातात व ऐकतात ) ( पुन: पडद्यांत ) " हा दुरात्म्या पाप्या निर्दया मदना, कायरे हें तूं दुष्टकृत्य केलेंस ? अहागे पापिणी महाश्वेते, ह्यानें तुझा कोणता अपकार केला ? अरे पाप्या चांडाळा चंद्रा, कृतार्थ झालासना ? हे दुष्टा दक्षिणवायो, तुझे मनोरथ पूर्ण झालेना ? आतां यथेच्छ वहा ! "

तर०—राजकन्ये, हा कोणा तरी पुरुषाचा करुणस्वर

आहे. काय असेल तें परमेश्वरास माहीत; परंतु कांहीं तरी अनिष्ट प्रकार आहे खरा.

महा०—चल, जिकडून हा स्वर येत आहे तिकडेच जाऊन शोध करूं.

( असें ह्मणून पुढें जातात. )

( पुन्हां पडद्यांत. )

पद. ( उद्धवा शांतवन कर जा० )

"पुंडरीक प्रियकर माझा मज टाकुनि कोठें गेला ॥ हा सखया! हा प्रिय बंधो! त्याग कसा माझा केला ॥धृ०॥ हा धर्मा! हा सुरलोका! निष्ठुर कां तुह्मीं झालां ॥ प्रिय माझा जिवलग गेला हाय हाय! अंतीं घाला ॥ चाल ॥ कैसा या विरहा साहूं। कोणाशीं प्रेमें बोलूं। हितगुज मी कोणा सांगूं। हा दैवा घाला पडला॥१॥"

महा०—( ऐकून व विचार करून दुःखानें ) तरलिके, हा त्या कपिंजलाचा स्वर ऐकूं येत आहे खचित. हाय हाय! देवा असा त्या कपिंजलावर काय प्रसंग आला असेल बरं?

तर०—पुढें जाऊं ह्मणजे सर्व कळून येईल. ( असें ह्मणून पुढें जातात तों पुन्हां पडद्यांत. ) "हा भगवन् श्वेतकेतो, पुत्रवत्सला, आत्महरण झालेलें जाणत नाहींस? हायगे सरस्वती, तूं विधवा झालीस ना! मध्या

पुंडरीका माझी वाट तरी पहा. हा मी तुझ्या मागून लवकर येतों. तुजवांचून मी एकटा क्षणभर देखील येथें रहावयास समर्थ नाहीं. अपरिचितासारखा, आज एकाएकीं मला सोडून कसारे चाललास! कशामुळें तुला ही आज अशी निष्ठुरता प्राप्त झाली, सांग बरं? मी तुजवांचून कुठेरे जाऊं? कोणाची योजना करूं? कोणास शरण जाऊं! मला या वेळीं सर्व दिशा शून्य झाल्या, माझें जीवित निरर्थक झालें, माझी तपश्चर्या व्यर्थ झाली, आणि लोकही सुखहीन झाले!!"

महा०—( दुःखानें ) अग तरलिके, आतां वाट कोणाची पहातेस? चल आपण आधीं त्या महाभागास जाऊन भेटूं. खचीत कांहीं तरी घात आहे, यांत शंका नाहीं.

( असें ह्मणून बाइबाईनें पुढें जाते, तों सरोवराचे तीरावर पुष्पशय्या करून तिजवर पुंडरीकास निजविलें आहे, उरस्थलावर कदलीचीं पानें ठेविलीं आहेत, उताणा पडला असून डावा हात उरस्थलावर पालथा ठेविला आहे, असा चेतनारहित दृष्टीस पडतो. )

कपिं०—( महाश्वेतेस पाहून मोठ्यानें आक्रोश करिता व पुंडरीकाचे गळ्यास मिठी मारून ) हायहाय! घात झाला!!

( "पुंडरीक प्रियकर माझा मज टाकुनि कोठें गेला" हें पद पुन्हां ह्मणतो व मूर्च्छित होतो. )

कपिं०—( सावध होऊन ) सख्या पुंडरीका, आतां कोणासहवर्तमान परिभ्रमण करूं ? कोणाजवळ बोलूं ? सांग बरं. आतां ऊठ लवकर; आणि तुजकरितां मी दुःखांत पडून विलाप करीत आहें अशा मला एकदां-तरी प्रतिवचन दे. अरे सख्या पुंडरीका, माझ्यावरचें सुद्धां प्रेम कोठें गेलें? आणि तें पूर्वीचें स्मितपूर्वक भाषण कसेंरे एकदम बंद झालें! आतां मी काय करूं!

( मूर्च्छित पडतो. )

महा०—( दुःखानें दीर्घश्वास टाकून आक्रोश करिते. )

अंजनीगीत.

हा नाथा! हा प्राणविसाव्या! ॥ त्यागुनि
अबला जाशी वनीं या॥साहूं कशी मीं तव
विरहा या ॥ निष्ठुर कां झाला ॥ १ ॥

हाय हाय! आतां काय करूं! अग आई, हा ताता, हे सख्यानों, तुह्मीं सर्व मला अंतरलां! हा पुंडरीका, हा जीविताधारा, हा अकरुणा, मला एकटी-ला टाकून तूं कुठं गेलास! तुझ्या करितां मी एकेक दिवस सहस्त्र युगाप्रमाणं घालविला.

पद. ( सत्वंर अनसूबे० )

सखया सोडुनियां जाशी मजला [illegible]
सा सुरलोकाला ॥ हाई विरहानल दुःसह
मजला ॥ काय करूं सखया याला ॥ आ-

तां शांतवील कोण मनाला ॥ होतां मज अति दुःखाला ॥ १ ॥

हायरे प्राणविसाव्या पुंडरीका, आतां मी काय करूं! कुठं जाऊं! कोणाजवळ बोलूं! एकदां उघडून मजकडे पहा तरी. माझा मनोरथ पूर्ण मी अनुरक्त दासी तुला शरण आलें आहे, इची तरी दया येऊं दे!

पद. (कांति फार तुला मज साठीं०)

नाथा त्यागुनियां मज गेलां काय करूं आतां॥ दुःख वियोगा साहुं कशी मी निष्ठुरता अशि कां मनि वरितां ॥ ध्रु० ॥ दीन अभागी दुर्बल दासी जाऊं कुठे मी कोणि न त्राता ॥ नाथा० ॥ कोप असा कां हृदयीं केला सांगुं कुणातें हितगुज आतां ॥ नाथा०॥ बंधु सखा, जननी प्रिय नाहीं हायहाय हा दुष्ट विधाता ॥ १ ॥

पुंडरीका, मजवर दया कां करीत नाहींस! स बरं मी तुझा कोणता अपराध केला! तूं सांगितले कोणतं काम मी ऐकिलं नाहीं! आणि तुझ्या इच्छे प्रतिकूळ असं माझं कोणतं आचरण तुझ्या दृष्टीस डलं, ह्मणून तूं इतका मजवर रागावलास? हायरे दैव मी तरी कशी वांचलें! हा नाथा! आतां मला नाहींस, आईबाप नाहींत, बंधु वर्ग नाहीं, इहलोक ना

परलोक नाहीं, धिक्कार असो अशा पापिणीला!! माझ्या कारितां तुझी अशी दशा झाली ना! जी मी तुला सोडून घरीं निघून गेलें, त्या माझ्या सारखी क्रूर अंतःकरणाची कोणीही स्त्री नसेल. काय मला घराचं प्रयोजन होतं, आईचा काय उपयोग, बापाचं काय कार्य, परिजनाचं तरी काय कारण होतं? हायहाय, आतां मी कोणास शरण जाऊं! निर्दया दैवा, ही तुला मी शरण आलें, तर माझा प्रियकर हीच मला देणगी दे. हे भगवती भवितव्यते, कृपा कर आणि ह्या अनाथ स्त्रीचं रक्षण कर. अहो भगवति वनदेवतांनों, तुह्मीं तरी प्रसन्न व्हा; आणि माझ्या प्रियाचं प्राणदान मला द्या. हे पृथ्वी, तूं मजवर कां कृपा करीत नाहींस?

पद. (हालये सुमन परी०)

**धांव प्रभू रमावरा छळीत दैव या हरा॥**
**दैवभोग आवरा॥करोनियां हरी त्वरा॥धृ०**
**अनाथ दीन मी वनीं॥कसं करूं प्रिया वनीं॥**
**मानवलें कसें मनीं। निद्य हें न या वरा॥१॥**
**वियोगजन्य ताप हा। न सोसवे मला पहा॥**
**जीव जाइना अहा। दयार्णवा मुनीश्वरा॥२॥**

(असें ह्मणून पुंडरीकाचे गळ्यास मिठी मारिते, व शोकानें) पुंडरीका, तूं मोठारे निष्ठुर आहेस! मी इतकी तुझी विनवणी करीत असतां, तुजकारितां पीडित झाले ल्या माझी तूं कांहीं देखील कींव करीत नाहींस!

पद. (गरफजल तेरा बारे०)

सदया कसा जाशी सजोनी प्रिया लोकीं ॥
विरहानळें बहु पोळते शांती न ती मज कीं॥धृ॥
प्रियप्राण हा मज तुच्छ नाथा मन रुष्ट कां झालें॥
मरणें कसें प्रिय तें तुह्मांशीं अहा रुचलें ॥ १ ॥
अति दुष्ट मी ह्मणुनी प्रिया मज दंड हा दे कीं॥
अवमान जरी घडला करावी क्षमा मज कीं ॥२॥

(पुंडरीकाचे गळ्यांतील मौक्तिकमाला पाहून रागानें)

हा पापिष्टे, कठीणहृदये--मौक्तिकमाले, तूं माझी असून मी परत येईपर्यंत, माझ्या प्रियाच्या प्राणाचें रक्षण तूं कसें केलें नाहींस ? ( मूर्च्छित पडते )

तर०—महाश्वेते, सावध हो, आणि आपल्या मनाचें शांतवन कर. झाली गोष्ट पुनः येत नाहीं.

महा०—( कपिंजलाकडे पाहून व त्याचे पायां पडून ) भगवन्, आतां या पुंडरीकाच्या उज्जीवनाचा तूं कांहीं तरी उपाय कर. हा त्याचा वियोग मला सहन न होतां उलटा प्राणनाशाला कारण होईल. हायरे दैवा ! !

कपिं०—(पुंडरीकाकडे पाहून दुःखानें श्वास टाकतो)

पद. (मांड दादरा.)

कसें मी करूं शोक कसा आवरूं॥ वियोगाग्नी जाळी कसें मी करूं॥ धृ०॥ अहा! कैसें अ-

**भाग्यातें त्यागिलें या ॥ कुठें जाशी त्यागुनी तूंच कीं अहा ! ॥ १ ॥**

( असें ह्मणून पुंडरीकाचे कंठास घट्ट मिठी मारतो. )

**महा०**—( तरलिकेला कंठाशीं धरून व दीर्घ श्वास टाकून ) तरलिके !

**पद.** ( रामचंद्र नाहिं घरीं० )

**अवचित हें संकट ये काय या करूं ॥**
**कोठवरी सांग सखे धीर मी धरूं ॥ धृ० ॥**
**दुःखलोट शोक कसा हृदयिं आवरूं ॥**
**हाय हाय ! काय करूं धांव श्रीगुरू ॥ १ ॥**

आतां मागं व्यर्थ शोक करीत बसणं उपयोगीं नाहीं. जिकडे हा माझा प्राणेश्वर गेला, तिकडेच आपण जावं हें बरं ! इहलोकीं नाहीं, तर परलोकीं तरी आह्मीं सुखानं राहूं. ( तरलिकेस ) अग निष्ठुरहृदये, ऊठ आतां. मी रडूं तरी किती ? लवकर काष्टं आणून चिता तयार कर. माझ्या जीवितेश्वराच्या मागून मला लवकर गेलं पाहिजे.

( तरलिका उठून उभी राहते इतक्यांत चंद्रमंडळापासून निघालेला श्वेतदेह, किरिट कुंडलें धारण करणारा, असा एक दिव्याकृति पुरुष अकस्मात् खालीं येतो व आपल्या हातांनीं मृत झालेल्या पुंडरीकास उचलून घेऊन जातो. जातांना महाश्वेतेस उद्देशून गंभीर वाणीनें, )

"वत्से महाश्वेते, तूं व्यर्थ प्राणपरित्याग करूं नको; कारण पुनः कांहीं दिवसांनीं तुझा ह्याच्याशीं समागम होणार आहे." (असें ह्मणून पुंडरीकासहवर्तमान आकाशमार्गानें एकदम उड्डाण करून निघून जातो. हें कृत्य पाहून कपिंजल, महाश्वेता, व तरलिका भय-चकित होतात.)

महा०–(कपिंजलास) भगवन्, हा काय चमत्कार आहे? हा दिव्यदेही पुरुष कोण? व त्यानं मृत शरीरास उचलून कुठं नलं?

कपिं०–(स्तब्ध होतो, मग एकदम घाबऱ्या घाबऱ्या उठून, आकाशाकडे पाहून रागानें) अरे दुष्टा अंतका, थांब थांब; माझ्या प्राणसख्याला घेऊन कोठें जातोस? (रागानें कंबर बांधून) थांब हा मी तुझा समाचार घेण्याकरितां आलों पहा.

(असें ह्मणून क्रोधानें त्या महापुरुषाच्या मागून धांवत जातो. ते दोघेही आकाशांत तारांगणांत प्रविष्ट होतात.)

महा०–(तरलिकेस) तरलिके, हा काय चमत्कार झाला बरं? माझ्यानं तर ह्याची कांहींच कल्पना करवत नाहीं!

तर०–(महाश्वेता प्राण देईल या भीतिनें तिचें सांत्वन करण्याकरितां) राजकन्ये, मला याची कांहींच कल्पना होत नाहीं; परंतु जो पुरुष आतां खालीं आला होता, तो दिव्याकृति होता. त्यानं तुला आश्वासन दिलं आहे. आणि असे जे दिव्य देहधारी पुरुष असतात

त्यांचं भाषण कधींही असत्य होत नाहीं. ह्याजकरितां विचार करून, प्राणपरित्याग करण्याचा जो तूं निश्चय केला आहेस, तो अगदीं सोडून दे. आणखी त्याच्या मागून कपिंजलही गेला आहे, तो आल्यावर हा दिव्य पुरुष कोण, कोठून आला, ह्यानं गतप्राण जो पुंडरीक ह्यास कशासाठीं वर उचलून नेलं, व कोठें नेलं, आणि त्यानं राजकन्येचं आश्वासन कोणत्या कारणास्तव केलं! हें अगोदर त्याजपासून समजावून घे, आणि नंतर तुला वाटेल तें कर. हेंच माझं तुला हात जोडून सांगणं आहे.

महा०–(दुःखानें) तरलिके, परंतु त्याला फार विलंब लागेल. तोंपर्यंत मी प्राण कसा धारण करूं? तो पुंडरीक आतां कशाचा भेटतो? कपिंजलाचीही आशा धरणं व्यर्थ आहे.

तर०–महाश्वेते तूं स्वस्थ रहा. कपिंजल जिवंत असतां तुला भेटल्यावांचून राहणार नाहीं. ह्या करितां तो येई पर्यंत तरी तूं प्राणत्याग करूं नको. या माझ्या विनंतीकडे कृपा करून लक्ष्य दे.

महा०–(कांहीं वेळ विचार करून आशेनें) बरं तुझी इच्छा आहे तर पुंडरीकाची भेट होई पर्यंत, प्राणत्याग न करितां, ह्याच सरोवराचे तीरीं आश्रम बांधून राहूं. आतां पुंडरीक भेटपर्यंत आप्तवर्गादिकांस तोंड दाखविणं व्यर्थ आहे. पुंडरीकाच्या प्रीतिमुळं त्याचींच हीं वल्कलं, हा त्याचा कमंडलू, ही त्याची अक्षमाला हेंच माझं सांप्रत भूषण आहे. आतां हे व-

स्त्रालंकार मला विषासारखे भासतात; त्यांचा त्याग करून, वैराग्याचें अवलंबन करून, इंद्रियनिग्रहानें, अनाथांचें रक्षण करणारा जो त्रैलोक्यनाथ सदाशिव आहे, त्यासच अनन्यभावानें शरण जावें. हे कैलासनाथा ! ताता शंकरा ! तुला हा माझा नमस्कार असो—

पद. ( मेरे गमकात राना० )

कोणि तारी ना दीना सौख्य न मना हाय ! उमाधवा ॥ हा प्रियप्राणा दुर्भागी जना सौख्य न मना हाय ! उमाधवा ! ! ॥ धृ०॥ हा नाथ ! माझा प्राण हा दुर्दैवें अनाथ॥ साहूं कैशी शोक हा तारी मातें भोळानाथ ॥ देवा मारीं न दीना दाना दे प्राणा सौख्य न मना हाय ! उमाधवा ॥ १ ॥

( असें ह्मणून दुःखानें तरलिकेसह निघून जाते )

---

## प्रवेश १ ला.

(तदनंतर राजा तारापीड याचा कंचुकी प्रवेश करतो.)

कंचु०–( आपल्याशीं ) काय दैवगती पहा.

पद. ( झोंझोटी–त्रीवट–झाली ज्याची० )

पराधीनता दुःखद भारी ॥ सौख्य नसे
कधीं चिंता अंतरीं ॥ धृ० ॥ पर सेवेसीं
तनु झिजवावी । आज्ञोल्लंघन भीति उप-
जवी । परसेवा ही छळी परोपरी ॥ १ ॥

जरी अशी स्थिती आहे तरी, आमचे महाराजांचे सु-स्वभावामुळें आह्मांला पराधीनपणाचें दुःख मुळींच होत नाहीं. महाराज किती दयावंत आहेत! आमचे धाकटे राजेसाहेब चंद्रापीड महाराज, हेही त्याचप्रमाणें किंबहुना जास्त दयाशील, शांत, व परोपकारी आहेत. आमचे महाराजांस व महाराजांचा मुख्य आवडता प्रधान जो शुकनास, या उभयतांनाही पुत्ररत्नें प्राप्त झालीं हा मोठा लाभच झाला. आमचे धाकटे महाराज, चंद्रापिड व प्रधानपुत्र वैशंपायन ह्यांचाही परस्परांविषयींचा प्रेमा फार वर्णनीय आहे. आमचे धाकटे महाराजांस तर त्या वैशंपायना वांचून क्षणभर देखील चैन पडत नाहीं. या उभयतांचा वियोग होऊं नये ह्मणून

महाराजांनीं, जवळच क्षिप्रानदीचे कांठीं, सुशोभित विद्यामंदीर तयार करवून त्यांत त्यांच्या संगती करितां गुरूचेच पुत्र ठेवले हेंही चांगलेंच झालें. आतां चंद्रापीड महाराजांस कोणत्याही तऱ्हेची काळजी राहिली नाहीं. ( इकडे तिकडे फिरतो. )

( पडद्यांत ) "अहो मृगया करणारे लोकहो ऐका. आमचे महाराजांची अशी आज्ञा आहे कीं, भगवान् सहस्रकिरण-सूर्य उदयास येण्याचे पूर्वी शिकारीची सर्व तयारी करून, व महाराजांचा आवडता घोडा जो इंद्रायुध त्याला उत्तम प्रकारें शृंगारून शिकारीस जाण्याकरितां तयार असावें."

कंचु०—( ऐकून आपल्याशीं ) एकूण आमचे महाराजांची शिकारीला जाण्याची तयारी आहे. राजे लोकांस मृगया ही योग्य आहे. आमचे चंद्रापीड महाराजांचा आवडता घोडा इंद्रायुधही बरोबर जाणार आहे. तेव्हां शिकारीची मोठीच तयारी दिसते. या इंद्रायुधाला पाहून परिक्षक लोक असें ह्मणतात कीं, उच्चैःश्रवा नामक इंद्राच्या अश्वाचीं सर्व लक्षणें, याच्या अंगावर आहेत. इंद्रायुधाला पाहिलें ह्मणजे असें वाटतें कीं, देवताही ऋषीच्या शापानें आपलीं शरीरें सोडून राहतात. त्याचप्रमाणें याची स्थिति कां नसेल? असो, आतां महाराजांचे दर्शनाला गेलें पाहिजे. शिकारीला जावयाची घाई असल्यामुळें महाराज लवकर उठतील; तर आतां अगोदर तिकडेच जावें

( जाऊं लागतो, पुढें पाहून व थांबून ) अहो! हे पहा आमचे महाराज सर्व तयारीसह, शिकारीला जाण्याकरितां, वाड्यासमोर तयार होऊन निघाले आहेत. बरोबर वैशंपायन प्रधानपुत्रही आहे. तर आतां अगोदर त्यांचे दर्शनाकरितां तिकडेच जावें. ( असें ह्मणून जातो. )

---

## प्रवेश २ रा.

स्थल—अरण्य.

( तदनंतर मृगया करीत चंद्रापीड वैशंपायनासह प्रवेश करितो. )

**वैशंपायन**—सख्या चंद्रापीडा, इकडे पहा—

**पद.** ( पिलु—धुमाळी. )

बहु चंचल गतिनें दृग्गोचर जहाला ॥
शरमार भयानें दांकवि अंगाला ॥ १ ॥
पदभाग मागचा आकुंचित जहाला ॥
बहु श्रांत होउनी सजितो श्वासाला ॥२॥
वदनांतुनि गळतो ग्रास मृणालाचा ॥
पळतां बघे हा वेग नृपा याचा ॥ ३ ॥

चंद्रापीड—सख्या वैशंपायना, या कुरंगानें आपल्याला बरेंच लांब आणिलें.

पद. ( बागेसरी—बहार—त्रीवट. )

चपल गतीनें मृग हा पळतो ॥
शरसंधाना भय नच गणि तो ॥
सन्निध असतां दुरवर जाई ।
क्षणक्षणा ये दुरुनी पाही ।
चकित करी मन स्थीर नव्हे तो ॥१॥

याकरितां आतां त्याचा नाद सोडून देऊन एखाद्या रम्य वृक्षछायेंत बसून जरा विश्रांति घेऊं चल. या मृगाच्या नादीं लागल्यामुळें आपल्या सैन्यापासून बरेंच दूर आलों. तिकडे सर्व सेना आपली वाट पहात असेल.

वैशं०—आपण सर्व सैन्यापासून दूर आलों, ही गोष्ट फार वाईट झाली. तिकडे त्यांनीं आपला शोध चालविला असेल. आपण नाहीं, हें ऐकून घरीं काय बरें ह्मणतील.

चंद्रा०—वैशंपायना, आतां विश्रांति घेऊं, आणि मग आपल्या मार्गाला लागूं.

वैशं०—बरें चल. ( जाऊं लागतात. )

चंद्रा०—( इकडे तिकडे फिरून व पाहून ) सख्या वैशंपायना, इकडे पाहिलेंस का? हा तपोवनाचा भाग असल्यामुळें—

पद. ( या जगीं पसरली० )

शुक पहा कसे नीपांवर शांतपणानें ॥
बसुनियां मुखानें स्वागत ह्मणती गाणें ॥
सुटतसे होमद्रव्यांसह सगंध पवनें ॥
तरुतळीं सुखानें प्रेमें बसती हरिणें ॥ १ ॥

वैशं०–सख्या चंद्रापीडा, ही पहा त्या ठिकाणीं रम्य दाट छाया आहे; तेथें बसून जरा विश्रांति घेऊं चल.

( असें ह्मणून एका दाट वृक्षछायेचे आश्रयाला जाऊन उभे राहतात. )

चंद्रापीड–मित्रा, राजलोकांना मृगया ही आनंद देणारी आहे खरी.

पद. ( बकावली हूं० )

सदैव मृगया खिन्न मनाला ॥
उल्हासा दे सकल तनूला ॥ ध्रु० ॥
चंचलता बरि बहु शरिराला ॥
मेद हरी करी कृश देहाला ॥
भूपा मृगया समर कृतीला ॥
व्यसन असावें सर्व नृपांला ॥ १ ॥

( इतक्यांत समोरच्या झाडींतून निघून पुढें जातांना एक किन्नरांचें जोडपें दृष्टीस पडतें तें पाहून. )

चंद्रा०—मित्रा, हा प्राणी कोण असावा बरें? असा अलौकिक प्राणी माझ्या पहाण्यांत कधींच आला नाहीं. याला धरावें अशी माझी फार इच्छा आहे, या करितां तूं त्या पलिकडच्या मार्गानें हळूच जाऊन त्याला इकडे मैदानांत हुसकावून दे, ह्मणजे मी त्याला धरतों. ( वैशंपायन व चंद्रापीड त्या किन्नरांचे जोडप्याच्या मागें त्यांस धरण्या करितां लागतात तों तें किन्नरयुग्म ह्यांना पाहून भयानें लांब अरण्यांत निघून जातें. वैशंपायनाची व चंद्रापीडाची चुकामुक होते. )

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ—अच्छोद सरोवराचा आसमंत भाग.

( वैराग्यवेष धारण केलेला असून हातांत पुंडरीकाचा दंड व कमंडलु घेतलेली अशी महाश्वेता प्रवेश करिते. )

महा०—( दुःखानें श्वास टाकून ) हे वनदेवतांनों, माझा प्राणनाथ तुह्मीं पाहिला काय?

पद. ( एजिसंया छांडन तूं० )

कोणि तरी प्राणसखा भेटवा कृपा करा हो भेटवा ॥ धृ० ॥ शीर्षी जटाभार रुद्राक्ष

धारी ॥ भस्मही चर्चियलें योगनिष्ठ तो
सदां ॥ कोणि० ॥ १ ॥ काया दिसे गौर
शोभा दुणावी ॥ मंजरी शोभतसे दंडकाष्ठ
ही करा ॥ कोणि० ॥ २ ॥ मोही मना
सौख्य नाहीं कदांही ॥ त्याविण जीव पहा
काळवे न हा बरा ॥ कोणि० ॥ ३ ॥

आतां माझा प्राणप्रिय पुंडरीक कुठून दृष्टीस पडणार! हा पुंडरीका! (डोळ्यांचें पाणी पुसून) हे वृक्षपाषाणांनो माझा प्राणनाथ तुह्मांला भेटला काय? (पुढें पाहून) ही पहा या जंबुवृक्षावर कोकिला बसली आहे, हिला विचारावें. बाई कोकिले!

पद. (विराट वदना पाखुनि०)

कोठें मतिमयकांत वसे गे मधुरालापें मज
सांगे ॥ त्यागी मजला क्रोधें वनीं फिरें
मी मतिभंगें ॥ परभृतिके तूं निष्ठुर होशी
कां न बोलशी मजसंगें ॥ कांतवियोगें
व्याकुल होई शोक न साहे या अंगीं ॥१॥

आतां व्यर्थ शोक करून काय उपयोग? त्या श्रीभवानीपतीला अनन्यभावानें शरण जावें; ह्मणजे तो माझ्या प्राणनाथाची व माझी भेट करवील.

(असें ह्मणून जाते.)

## प्रवेश ४ था.

स्थल— अरण्य.

( तदनंतर किन्नरयुग्म नाहींसें झाल्यामुळें खिन्न झालेला असा चंद्रापीड प्रवेश करितो. )

चंद्रा०–( दुःखानें ) हायहाय ! शेवटीं त्या किन्नरयुग्मानें मला एकट्याला लांब अरण्यांत आणून फसविलें. व्यर्थ श्रम ! व्यर्थ श्रम ! आतां त्याचा नाद पुरे. ( पुढें पाहून ) अरे, या ठिकाणीं मार्ग तर मुळींच दिसत नाहीं. आतां काय करूं? मी लहान मुलाप्रमाणें व्यर्थ इतका आयास कां केला ! हें किन्नराचें जोडपें धरून किंवा न धरून मला काय कर्तव्य होतें बरें ? धरलें असतें तरी काय फळ मिळणार होतें, आणि धरलें नसतें तरी काय हानी होणार होती ! काय हो हा मूर्खपणाचा प्रकार, काय ही तुच्छ कर्म करण्याविषयीं आसक्ति, निरर्थक व्यापाराविषयीं काय हा आग्रह, आणि कायहो ही माझ्या पोरकटपणाच्या आचरणाविषयींची गोडी ! उत्तम फळ देणारें जें मी कर्म केलें, तें सर्व व्यर्थ गेलें; आणि अवश्य कर्तव्य जें मी आरंभिलें होतें, तें सर्व विफल झालें. तसेंच मित्रकार्य जें करावयाचें तें निष्पन्न झालें नाहीं. त्याचप्रमाणें जो राजधर्म आरंभिला, तो ही पुरता झाला नाहीं;

पित्याचें जें कार्य आरंभिलें, तेंही शेवटास गेलें नाहीं. हाय हाय! मी आपला सर्व परिवार सोडून इतक्या दूर प्रदेशास कशासाठीं आलों? आणि ह्या घोडतोंड्याच्या पाठीस उगाच कां बरें लागलों? मला समजत नाहीं कीं, मी आलों कोठें. माझ्या मागून येणारें सैन्य किती लांब राहिलें. माझा सखा वैशंपायन कोठें मार्ग चुकला? (थांबून विचार करून) आतां परत तरी कसा जाऊं? मार्ग तरी मला कोण सांगणार? या ठिकाणीं कोणी मनुष्य भेटेल असें वाटत नाहीं, मग सुवर्णपुराचा मार्ग मला कोण सांगेल? (पुनःविचार करून) असो परंतु लोकांच्या मुखानें अशी गोष्ट ऐकिली आहे कीं, पृथ्वीवरच्या सर्व प्रदेशांची उत्तरेकडील शेवटची मर्यादा सुवर्णपुरच आहे. त्याच्या पलिकडे निर्मनुष्य अरण्य आहे, व त्याच्या पुढें कैलासपर्वत आहे; आणि कैलासपर्वत तर हा जवळच दिसत आहे! तेव्हां आतां येथून माघारेंच परतावें. मग कसें घडेल तें खरें. आतां अन्यजनास दोष देणें व्यर्थ आहे, कारण आपण जे दोष करावे त्याचें फळ आपलें आपणच भोगिलें पाहिजे. (इकडे तिकडे फिरून व पाहून) हा वनप्रदेशाचा देखावा फार आनंद देतो—

पद. (अष्टपदीचे चालीवर.)

**रमवि सुखद वन बहु नयनातें ॥ रम्य लतावन भुलवि मनातें ॥ शोभतो किती र-**

मणीय हा गिरी। दर्शन सुख हें ताप नि-
वारी ॥ धृ०॥ मंद सुगंधित शीतल पवनें।
सुखकर भारी चंदनरानें ॥ शो० ॥ उंच
तरूवर गगना शिवती ॥ कमलकंद या
वेली दिसती ॥ शो० ॥ हंस मयूरी को-
किल गाती ॥ मंजुस्वन शुक पक्षी करिती
॥शो०॥ विद्याधर किन्नर ज्या स्तविती ॥
शिवगण भावें भक्ति करिती ॥ शो० ॥
कैलासीं शिवगिरजा वसती ॥ तो शिव
पावो सकलां जगतीं ॥ १ ॥

( इकडे तिकडे फिरून व पाहून ) समोर सरोवर दिसत आहे, हें किती मनोहर आणि दृष्टीस आल्हाद देणारें आहे! या सरोवरांतील उदकाच्या अति स्वच्छत्वा-मुळें हें सरोवर त्रैलोक्यलक्ष्मीचा मणिमय आरसाच आहे काय, असा भास होतो. असो; आतां या सरोवरतीरावर क्षणभर बसून जरा विश्रांति घ्यावी. ( असें म्हणून अच्छोद सरोवराचे तीरावर एका वृक्षछायेंत जाऊन बसतो; इतक्यांत वीण्याच्या झंकार शब्दानें मिश्रित झालेला असा अलौकिक मधुर गायनस्वर त्याच्या कानीं येतो, तो ऐकतो व आश्चर्यानें, ) हा काय चमत्कार ! जेथें मनुष्य संचार देखील करीत नाहीं, त्या प्रदेशांत हा गायनध्वनि कुठून कसा होतो ! ( उभा राहून ज्या दिशेकडून तो गायनध्वनि ऐकूं येत होता त्या दिशेकडे पाहूं लागतो. )

पद. ( झिंझोटी–पिलु–दादरा. )

हा मंद मंद मधुरध्वनी गीतरसानें ॥
आनंदवीत हृदय हरित उंच स्वरानें ॥
आलाफ तान सहित गान मधुरवादनें ॥
झंकार फार ही सतार भुलवी गायनें ॥ १ ॥

( पडद्यांत. )

पद. ( बिहाग–झिंझोटी–त्रिवट–अभिनव मधु० )

हरहर! शिवसांभ प्रभो! पाहि पाहि मां ॥
चरणकमलभृंग सुमन पाहि पाहि मां ॥ धृ० ॥
वेदांता पार नसे । सुरवर पद वंदितसे ॥
ब्रह्मरूप मूळ असे । विश्व वंद्य शिव भासे ।
आदि पीठ विश्वंभर पाहि पाहि मां ॥ १ ॥

चंद्रा०–जिकडून हा गायनाचा ध्वनि येत आहे, तिकडे जाऊन शोध केला पाहिजे. ( असें ह्मणून गायनाचे आवाजावर त्या प्रदेशाकडे जातो; तों एक देवालय त्याच्या दृष्टीस पडतें त्यास पाहून ) आहाहा ! हें देवालय तरी किती रमणीय दिसत आहे. ( पुढें जाऊन व पाहून ) भगवान् चंद्रचूड शूलपाणि जो महादेव, त्याची मूर्ति ह्या देवालयांत असून तिच्या योगानें ह्या मंदिराला फारच शोभा आली आहे. हे त्रिभुवनपूज्य चराचरगुरु भगवान् कैलासनाथ ! हा तुला माझा नमस्कार असो. ( नमस्कार करितो. )

( इतक्यांत पुनः पडद्यांत " हर हर ! शिवसांभ प्रभो ! पाहि पाहि मां " हें पद ऐकूं येतें. )

चंद्रा०-( पाहून आश्चर्यानें आपल्याशीं ) ही पहा येथें, भगवान् चंद्रचूडाचे समोर, ब्रह्मासनावर बसलेली व हातांत वीणा घेऊन गायन करणारी व पाशुपत व्रताचीं चिन्हें धारण करणारी अशी नवयौवना स्त्री, एकाग्रदृष्टि लावून बसली आहे. अहाहा ! काय हें विलक्षण स्त्रीसौंदर्य ! !

पद. ( लाल शालजोडी जरतारी० )

मूर्ति रतीची काय असे ही शुभ्रपणा हरि सुमनातें ॥ जटा मस्तकीं पिंगट असुनी रक्तपणानें शोभविते ॥ मौक्तिकमाला कंठीं वसती . शोभविती किति हृदयातें ॥ करीं कंकणें शंखमण्याचीं भस्मांकित तनु बहु खुलते ॥ वल्कलवेष्टित काया असुनी दंडकमंडलु जवळि ते ॥ रम्य मनोहर वीणा शोभे गीतरसानें रंजविते ॥ शिवध्यानीं लय लागुनि राहे वैराग्यातें ही वरिते ॥ एकनिष्ठता पूर्ण दिसे ही कोण कुणाची कां झुरते ॥ १ ॥

हिच्या आकृतीवरूनच हिच्या अमानुषत्वाचें अनुमान होतें. आणखी अशा प्रकारच्या गायनाचा संभव तरी मर्त्यलोकांत कोठून होणार ? आतां जर ही अकस्मात् माझ्या दर्शनमार्गांतून निघून जाणार नाहीं, अथ-

वा कैलासपर्वताच्या शिखरावर चढून त्या किन्नरांच्या जोडप्या प्रमाणें नाहींशी होणार नाहीं, तर ही कोण हिचें नांव काय, आणि कोणत्या कारणास्तव हिनें अ- शा पूर्ववयांतच हें व्रत घेतलें आहे, हें सर्व हिला पु- जाऊन विचारीन. ( असा विचार करून तिच्या बा- जूस एका खांबाचे आड उभा राहतो. )

महा०-( आपल्याशीं )

पद. ( बिहाग-झिंजोटी-दादरा. )

हर हर ! शिवसांभ प्रभो पाहि पाहि मां ॥
चरण कमल भृंग सुमन पाहि पाहि मां
॥ धृ० ॥ वेदांता पार नसे । सुखकर पद
वंदितसे । ब्रह्मरूप मूळ असे । विश्ववंद्य
शिव भासे । आदि पीठ विश्वंभर पाहि
पाहि मां ॥ १ ॥

( हें पद झाल्यावर महादेवास नमस्कार करून वीणा खालीं ठेविते व शांतवृत्तीनें चंद्रापीडाकडे पाहून ) अ- तिथीस स्वागत असो. हे महाभागा ! तूं ह्या भूमीवर कसा आलास ? आणि अशा संकटांत पडण्याचें कारण काय ? ( आसन पुढें करून ) या आसनावर बसू- जरा विश्रांति घेऊन श्रम परिहार करावे.

चंद्रा०-( महाश्वेतेस ) हे भगवति, जशी आपली आज्ञा होईल त्या प्रमाणें वागण्यास मी सिद्ध आहे ( आसनावर बसतो व आपल्या मनाशीं विचार करितो ,

आहाहा ! काय ही लीनता! तपस्विजनांमध्यें दुर्लभ अशा दिव्य रूपानें संपन्न ही कन्यका मोठ्या सौजन्यानें माझा इतका मोठा सत्कार करीत आहे, ह्यावरून मला असें वाटतें कीं, जर मी हिची प्रार्थना केली, तर ही आपली सर्व हकीगत मला सांगेल ह्यांत संशय नाहीं.

महा०—( कमंडलुमधील पाणी हातांत घेऊन अर्घ्य देण्याच्या उद्देशानें त्याच्या पुढें येऊन ) याचा स्वीकार करावा.

चंद्रा०—पुरे पुरे. ह्या अत्यंत सत्कारामुळें माझ्या मनास फार संकोच होतो; इतका प्रयास कशाला पाहिजे? हे भगवती, क्षमा कर; हा इतका अत्यादर नको, तुझें केवळ दर्शनच सर्व पापाचें प्रशमन करावयास व सर्व प्रकारें पवित्रता मिळविण्यास समर्थ आहे. तर आतां विशेष आयास न घेतां आपण खालीं बसावें.

( महाश्वेता खालीं आसनावर बसते. )

चंद्रा०—हे भगवती, आज तुझ्या प्रसादाची प्राप्ति झाली, ह्यामुळें मला विलक्षण आनंद होऊन तुझें सर्व वर्तमान जाणण्याची इच्छा स्वाभाविक रीतीनें माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली आहे; आणि प्रश्न करण्यास हा अवसर योग्य किंवा अयोग्य ह्याचा विचार न करितां ही जिज्ञासा बळेंच मला आपणांस प्रश्न करण्याविषयीं भाग पाडीत आहे. कारण कीं, प्रभूचा प्रसाद थोडा जरी झाला, तरी तो अधीर पुरुषास धैर्य उत्पन्न करितो. आणि दोघांचें राहणें एका ठिकाणीं थोडा वेळ

जरी झालें, तरी तें परिचय उत्पन्न करितें. त्याच प्रमाणें प्रवासांत थोडा जरी उपचार झाला, तरी तो स्नेह उत्पन्न करितो.. ह्मानकरितां भगवतीस जर कांहीं अडचण नसेल, किंवा अत्यंत खेदास कारण नसेल, तर भगवतीनें आपलें वर्तमान सांगून या जनावर अनुग्रह करावा, असें मी इच्छीत आहे.

पद. ( पिलु जिल्हा. )

**जन्मानें कोण्या राजर्षीचा वंश अलंकृत केला ॥ आत्मवियोगें देश कोणता पावविला दुःखाला ॥ वैराग्यानें काळ लोटणें सुखकर होइ तनुला ॥ घोर वनीं या राहुनी ऐसा देह दंड कां केला ॥ १ ॥**

( असें ऐकून महाश्वेता दुःखी होऊन रुदन करूं लागते व डोळे आपल्या वल्कलांनें पुसते तें पाहून )

चंद्रा०—( आश्चर्यानें आपल्याशीं ) काय आश्चर्य आहे कीं, ज्या आकृतीचा पराभव कशानेंही व्हावयाचा नाहीं, त्या आकृतीचाही पराभव दुःखाच्या योगानें होतो. तस्मात् ज्यानें ह्मणून शरीराचा स्वीकार केला, त्याला दुःखें स्पर्श करणार नाहींत, असें नाहीं. हिच्या आश्रुपातानें मला मोठें नवल वाटतें कीं, क्षुद्र आघातानें जशी भूमि कंपित होत नाहीं, तशाच अशा प्रकारच्या मूर्ति थोड्याशा कारणानें शोकास पात्र होऊं नयेत. (विचार करून) हिच्या शोकस्मरणास मीच कारण

झालों, तस्मात् मी हिचा अपराधी आहे. तेव्हां हिच्या शोकाचें निवारण केलें पाहिजे. ( असें ह्मणून कमंडलूमधील पाणी पुढें करितो. )

**महा०**—( कमंडलूमधील पाणी नेत्रांस लावून व दीर्घ श्वास टाकून ) हे राजपुत्रा, जी कठीण हृदया, जी दुर्दैवा, अशा स्त्रीचें जन्मापासून वैराग्यवृत्तीपर्यंतचें वर्तमान ऐकून तुला काय फळ आहे? तथापि जर तुला ऐकण्याचें कौतूक वाटत असेल, तर सांगते ऐक. देवलोकीं अप्सरा ह्मणून कन्यका आहेत, त्या तुला ऐकून ठाऊक असतीलच. त्या अप्सरांची चौदा कुळें आहेत. त्या पैकीं शेवटल्या कुळामध्यें चित्ररथ नांवाचा राजा झाला. त्या चित्ररथाचें राहण्याचें स्थळ येथून जवळच भारतवर्षाच्या उत्तर सीमेवर किंपुरुष नामक वर्षामध्यें, हेमकूट नांवाचा पर्वत आहे तो होय. त्यानेंच चैत्ररथ नामक अत्यंत मनोहर असें हें अरण्य निर्माण केलें. आणि हें अच्छोद सरोवरही त्यानेंच खणवून हा भगवान भवानीपति येथें स्थापन केला.

**चंद्रा०**—( आश्चर्यानें ) एकूण हा सर्व प्रदेश व हें रम्य सरोवर गंधर्वानें निर्माण केलें आहे तरीच! बरें पुढें?

**महा०**—अरिण ह्मणून जी एक त्या वेळीं दक्षकन्या होती, तिला सहा पुत्र झाले, त्यापैकीं हंस नामें गंधर्वराज अद्यापि गादीवर आहे. चंद्रकिरणापासून जें कुळ उत्पन्न झालें, त्यांत अत्यंत रूपवान व नेत्रांस आनंद देणारी अशी गौरी नांवाची कन्या उत्पन्न झा-

ली. तिच्याशीं दुसऱ्या गंधर्व कुळाचा अधिपति जो हंस त्यानें संबंध केला. त्या उभयतांचे पोटीं ही दुर्लक्षणा, हतभागी अशी मी एकच कन्या झालें.

चंद्रा०—( आपल्याशीं ) एकूण हिची उत्पत्ति गंधर्व कुळापासून आहे ! तरीच. नाहींतर सामान्य मनुष्याचे कुळांत असें रत्न कुठून प्राप्त होणार? ( उघड ) बरं मग ?

महा०—नंतर माझे पित्यानें माझें नांव महाश्वेता असें ठेवलें, नंतर बाल्यावस्था मी कृपाळूपानें पित्याच्याच घरीं घालविली. ( इतकें सांगून महाश्वेता स्तब्ध होते व रुदन करूं लागते. )

चंद्रा०—( आश्चर्यानें आपल्याशीं ) हें काय! हिला दुःख होण्याचें काय कारण?

महा०—( डोळे पदरानें पुसून दुःखानें ) राजपुत्रा, आतां या पुढें सर्व हकीगत सांगण्यास ही माझी जिव्हा धजत नाहीं; करितां आतां हा वृत्तांत पुरे. सूर्यही अस्तास चालला, नित्यकर्म आटोपण्याची वेळ झाली; तेव्हां आतां माझे आश्रमीं चलावें. त्या ठिकाणीं सर्व वृत्तांत कळून येईल.

चंद्रा०—( नम्रतेनें ) भगवतींचे इच्छेप्रमाणें वागण्यास हा जन तयार आहे; चलावें.

( उठून विणा व कमंडलू घेऊन दुःखानें “ कोणि तारी ना दिना सौख्य न मना ” हें पद्य ह्मणत निघून जाते. मागून चंद्रापीडही निघून जातो. )

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ— आश्रमस्थान. अच्छोद सरोवरावरचा बाह्य प्रदेश.

चंद्रा०—भगवती, तुझ्या वनवासांतली मैत्रीण आणि तुझ्या दुःखाची सोबतीण, अशी जी तुझी सखी तरलिका ह्मणून तूं सांगितलीस ती कोठें गेली ?

महा०—भाग्यवंता राजपुत्रा, मागें जीं चौदा कुलं तुला सांगितलीं, त्या चौदां पैकीं, अमृतापासून जें अप्सरांचं कुल उत्पन्न झालं ह्मणून सांगितलं, त्या कुलांत मदिरा नांवाची एक सुलक्षण कन्या उत्पन्न झाली. तिला चित्ररथ गंधर्वानं आपली पट्टराणी केली. तिच्या पासून जी मी तुला मत्प्राणसखी कादंबरी माझी सखी आहे ह्मणून सांगितली, ती उत्पन्न झाली. तिची माझ्या ठिकाणीं अत्यंत ममता असल्यामुळ, माझ्या दुःखदायक वृत्तांतानं फार शोकाकुल होऊन तिनं असा नियम केला कीं, जोंपर्यंत महाश्वेता शोकयुक्त आहे, तोंपर्यंत मी आपलं पाणिग्रहण करविणार नाहीं. आणखी तिनं अशी शपथ घेतली आहे कीं, माझी इच्छा नसतां जर माझा पिता बलात्कारानं मला कोणास द्यावयास इच्छील, तर मी प्राणत्याग करीन. अशी तिची प्रतिज्ञा ऐकून तिचं सांत्वन करण्या करितां मी तरलिकेला तिजकडे धाडलं आहे. ती तर-

लिका निघून गेली, इतक्यांत महाभाग्यवान् आपण ह्या प्रदेशास आलां. तिला जाऊन बराच वेळ झाला आहे, कदाचित् ती इतक्यांत निरोप घेऊन परत येईल. ( इतक्यांत तरलिका केयूरकासह प्रवेश करिते. )

महा०—( तरलिका आली हें पाहून ) सखे तरलिके, तूं कादंबरीस भेटलीस ना ? ती कशी काय खुशाल आहेना ? माझें वचन ती मान्य करील असें तुला वाटतें का ?

तर०—राजकन्ये, मी कादंबरीस भेटलें, ती सर्व प्रकारें खुशाल आहे. तूं सांगितलेला निरोप मी तिला कळविला. तो तुझा निरोप ऐकून तिच्या नेत्रांतून अश्रू गळूं लागले. तिनें तुला उलट निरोप पाठविला आहे. तो मजबरोबर आलेला हा तिचा वीणाधारी केयूरक तुला सांगेल.

महा०—( केयूरकास ) केयूरका, माझी प्रियसखी जी कादंबरी तिचा काय निरोप आहे ?

केयू०—( पुढें होऊन महाश्वेतेस, ) हे महाश्वेते, देवी कादंबरी तुला दृढ आलिंगन करून विज्ञापना करीत आहे कीं, तरलिकेबरोबर जो तूं निरोप धाडलास हा काय गुरुजनाच्या वचनावरून, किंवा माझें मन पाहण्यासाठीं, किंवा मीं तुला सोडून घरीं राहिल्याबद्दल माझी निंदा करण्यासाठीं ? माझें हृदय तुजविषयीं किती प्रेमभरित आहे, हें तूं जाणतच आहेस. असें अ-

सतां अति निष्ठुर निरोप सांगून पाठविण्याविषयीं तुला शंका कशी वाटली नाहीं? ज्यानं माझ्या सखीची अशी दशा केली, तो काम मी सकाम कसा करूं? तिकडे तूं विरहदुःखित होऊन, व्रत नियमांनीं देह कृश करून कष्ट अनुभवीत असतां त्याची अवगणना करून पाणिग्रहण सुखाची इच्छा मीं करावी काय? तुझ्या प्रेमामुळं कुमारीस विरुद्ध जें स्वातंत्र्य तें मी स्वीकारलं अयशाचा अंगिकार केला, गुरुजनाचा अतिक्रम केला, लोकापवादाचं भय सोडलं, आणि स्त्रीजनांस भूषणभूत जी लज्जा तिचाही परित्याग केला. असं असून मी ह्या कर्माविषयीं कशी प्रवृत्त होऊं? तर मी तुला हात जोडून, पायां पडून प्रार्थना करिते कीं, मजवर अनुग्रह कर. माझ्या जीवितासहवर्तमान तूं येथून वनांत गेलेली आहेस; ह्मणून अशी गोष्ट स्वप्नामध्येंही आणूं नको.

( असें सांगून केयूरक स्तब्ध बसतो. )

महा०–( दुःखानें श्वास टाकून व विचार करून ) केयुरका, तूं जा, मीच स्वतः तिथं येऊन काय तें यथायोग्य करीन.

केयू०–ठीक आहे. ( असें ह्मणून जातो. )

महा०– ( चंद्रापीडास, ) हे महाभागा राजकुमारा, हेमकूट पर्वत तूं कधीं पाहिला नसशील. त्या ठिकाणींच माझी प्रियसखी कादंबरी राहते. जर तिकडे जाण्यानं आपणांस फार श्रम होत नसतील किंवा कोण-

त्याही कार्यास अडथळा येत नसेल, माझी प्रार्थना विफळ करणं नसेल, तर मी आपणांस प्रार्थना करितें कीं, रमणीयतेचं निधान अशा त्या हेमकूट पर्वतावर मजसहवर्तमान चलावं, आणि माझ्याहून जी तिळप्रायही भिन्न नाहीं, अशा कादंबरीस पाहून, तिचं जें कुमती युक्त मोहचेष्टित त्याचं निरसन करून तिथं एक दिवस विश्रांति घेऊन, दुसरे दिवशीं ह्या ठिकाणीं परत यावं.

चंद्रा०—भगवती, आपलें दर्शन झाल्यापासून मी आपल्या स्वाधीन झालों आहें. जें कर्तव्य असेल, त्या विषयीं मनांत शंका न धरितां पाहिजे तशी माझी योजना करावी.

महा०–ठिक आहे चलावं. ( जातात. )

(पडदा पडतो.)

## तिसरा अंक समाप्त.



# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

### स्थळ—गंधर्व राजाचा वाडा आणि कादंबरीचें अंतःपुर.

( कादंबरी केयूराजवळ बोलत बसली आहे. व जवळ मदलेखा बसली आहे. )

कादंबरी—( उत्कंठनें ) केयुरका, माझी प्रिय सखी महाश्वेता, तुला कुठं भेटली, ती काय करीत होती, तूं तिला माझा निरोप सांगितल्यावर ती काय ह्मणाली, ती एकटीच स्वस्थ बसली होती किंवा तिचा प्रियसखी जवळ होती? सांग बरं ?

केयू०—मी तिला आपला निरोप सांगितला, तेव्हां तिनें दुःखानें श्वास टाकला व विचार करीत स्तब्ध बसली.

कादं०—( आपल्याशीं दुःखानें ) एकंदरींत माझ्याबद्दल तिला फार वाईट वाटलं असेल ! ( केयूरकास ) केयूरका, मग ती काय ह्मणाली ?

केयू०—कांहीं वेळ विचार केल्यावर तिनें सांगितलें कीं, " तूं जा, मीच स्वतां तिथं येऊन काय तें यथायोग्य करीन " असें सांगून मला निरोप दिला.

कादं०—बरं केयुरका, मघाशीं जो तरुण राजपुत्र महाश्वेतेजवळ बोलत बसला होता ह्मणून सांगितलेंस, तो राजपुत्र महाश्वेतेच्या परिचयांतला होता का? इतकें त्याचें लोकोत्तर सौंदर्य असून तो घोर वनांत कां आला? तो कोणी गंधर्वराज नसेल ना?

कामदा.

कोण तो असे धन्य भूपती ॥ रूप सुंदरा कोठे महीपती ॥ जन्म घेतला कोणत्या कुळीं ॥ राज्य भोगितो कोणत्या स्थळीं ॥१॥

केयुरका, माझी प्रियसखी जी महाश्वेता तिजबरोबर तो काय काय बोलत होता? तूं त्याच्याशीं कांहीं बोललास का?

केयू०—राजकन्ये, त्यानें महाश्वेतेशीं जें भाषण चाललें होतें, त्यावरून तो थोडा तरी तिचे परिचयाचा असावा असें दिसतें. आतां इतक्यांत महाश्वेता येईल, ती आल्यावर ह्या राजपुत्राचा सर्व वृत्तांत कळून येईल.

कादं०—महाश्वेतेला येण्याला विलंब कां बरें लागला?

( इतक्यांत महाश्वेता चंद्रापीडासह प्रवेश करिते. )

महा०— ( आपल्याशीं )

पद. ( विठाबाई माउली० )

गिरिजावर हर स्मरा सदाशिव ॥ गिरि-

जावर हर स्मरा ॥ धृ० ॥ भूतगणांचा
नायक शंकर । भक्तीवश तो करा । स-
दाशिव गिरिजावर हर स्मरा ॥ १ ॥
स्थिति संहारा कारण एकचि ईश्वर तो
प्रियकरा । सदाशिव ॥ गिरिजाव० ॥
सांभ सदाशिव भोळा तो शिव । देइल
पदिं आसरा ॥ सदाशिव गिरि० ॥ २ ॥

चंद्रा०—(कादंबरीला पाहून आपल्याशीं आनंदानें) अहाहा! काय हें सौंदर्य!!* धन्य आहे विधात्याची कीं, त्यानें असलें हें उत्तम लक्षणांनीं युक्त, व रूपसंपन्न गंधर्वराजकन्यारत्न उत्पन्न केलें!

पद. (दुर्लभ वस्तु प्राप्त व्हावया०)

नूतन कोमल प्रियवल्ली ही श्रेष्ठ विधीनें
निर्मियली ॥ लावण्यानें हरी मनातें मदन
प्रिया रति उद्भवली ॥ आभरणें ही नटली
सजली काया तणें बहु खुलली॥ विभूषणाचें
भूषण वाटे धन्य विधीची कृति झाली॥ १॥

माझीं हीं इतर इंद्रियें ब्रह्मदेवानें नेत्रमयच कां केलीं नाहींत? ह्या माझ्या नेत्रयुग्मानें जन्मांतरीं कोणतें शुभ कर्म आचरिलें असेल कीं, ज्याच्या योगानें आज ह्या कादंबरीस निष्प्रतिबंध पहात आहें. असें रूप उत्पन्न करण्यास त्यानें सामुग्री तरी कोठून आणली असेल?

( चंद्रापीडास पाहून कादंबरी उठते व लज्जेनें पदर सांवरिते. )

काद०—( चंद्रापीडाकडे पाहून आश्चर्यानें चकीत होते व आपल्याशीं विचार करिते ) केयूरकानं ज्याचं वर्णन केलं, तो तर हा, नसेलना !

पद. ( बिभास—दादरा—जाईजुई मोगरी ही० )

कुसुमायुध मूर्तिमंत आजि देखिला ॥
नूतन हा लाभ मला विधिवशें भला ॥
नाहिं कधीं आजवरी नयनिं पाहिला ॥
दैवबळें धन्य करिन काय आपुला ॥ १ ॥

( उघड महाश्वेतेस. )

अंजनीगीत.

ये ये सखे भेट मजशीं ॥ आलिंगन सुख दे हृदयाशीं ॥ विरह व्यथा ही दुःसह कशी ॥ साहूं या शरिरीं ॥ १ ॥

( महाश्वेतेस प्रेमालिंगन देते व महाश्वेताही प्रेमानं तिला भेटते. )

महा०—( चंद्रापीडाकडे बोट दाखवून ) सखे कादंबरी, हा राजपुत्र कोण हें तूं समजलीस का ? भारतवर्षामध्यें समुद्रवलयांकित पृथ्वीचं राज्य करणारा, व

प्रजांचें उत्तम प्रकारें संरक्षण करणारा, तारापीड नांवाचा प्रसिद्ध सार्वभौम राजा तूं ऐकिलाच असेल, त्याचा पुत्र चंद्रापीड महा पराक्रमी, दिग्विजयाच्या प्रसंगानें ह्या भूमीत प्राप्त झाला आहे. मला ह्याचें दर्शन झाल्यापासून कारण नसतांही हा माझ्या बंधुतेस पात्र झाला आहे, आणि सर्वसंग परित्याग करून विरक्त व निष्ठुर झालेली जी माझी चित्तवृत्ति, तिचें ह्यानें आपल्या सरळ स्वभावाच्या गुणांनीं आकर्षण केलें आहे. तुला एक सांगतें कीं, चतुर असून सौजन्यानें वागणारा निमित्तावांचून मैत्री करणारा, असा हा पुरुष ह्या जगांत फार दुर्लभ आहे; ह्मणून माझ्याप्रमाणें तुलाही ह्याला पाहूनच असें वाटेल कीं, ब्रह्मदेवानें ह्या पुरुषास निर्माण करण्यामध्यें आपलें फारच कौशल्य दाखविलें आहे. येवढ्यासाठीं ह्याला मी ह्याची इच्छा नसतां बळेंच मजबरोबर आणिलें आहे. तुजविषयीं ह्याला मीं पुष्कळ प्रकारानें सांगितलें आहे. तर ह्याचें अपूर्व दर्शन झाल्यामुळें प्राप्त होणाऱ्या लज्जेचा त्याग करून, ह्याचा आपला परिचय नाहीं ह्याजमुळें होणाऱ्या अविश्वासासही सोडून देऊन, याच्याबद्दलची कांहीं एक शंका मनांत न आणतां, माझ्याशीं जसें तुझें वर्तन आहे तसेंच ह्याच्याशीं असावें, अशी माझी इच्छा आहे. हा तुझा बंधुजन, मित्र, व परिजन आहे. हेंच तुला माझें सांगणें आहे.

चंद्रा०—( आपणांविषयीं महाश्वेतेनें कादंबरीस सांगितलें असें जाणून आनंदानें प्रणाम करितो. कादंबरी

उठून महाश्वेतेचे पाय धुते; व लुगड्याच्या पदरानें पुसून महाश्वेतेजवळ बसते. मदलेखा चंद्रापीडाचे पाय धुते. )

महा०—( कादंबरीच्या खांद्यावर हात ठेवून व मस्तकावरून हात फिरवून ) सखे कादंबरी, तूं खुशाल आहेसना ?

कादं०—( मोठ्यानें ) सखे महाश्वेते, मी खुशाल आहे बरं! परंतु सखे तुजकडे पाहून मला फार वाईट वाटतं. कारण मी अशा या रम्य ठिकाणीं नानाविध विलासरसांचा उपभोग घेत आनंदानं रहावं, आणि जी माझी अतिशय आवडती प्रियसखी तूं, तिनं महा अरण्यांत वैराग्यवेषानं रहावं. ह्या मुळें फार वाईट वाटतं.

महा०—सखे कादंबरी, ह्याचं तूं मुळींच दुःख वाटूं देऊं नको. भवितव्यतपुढं उपाय नाहीं. कादंबरी, आपल्या बोलण्याच्या नादांत नवीन आलेला पाहुणा जो हा चंद्रापीड ह्याचं स्वागत करण्याचं राहिलं. तर अगोदर पादप्रक्षालन करून ह्यांस तांबूल दे.

कादं०—( महाश्वेतेच्या कानाशीं लागून ) सखे, ह्याचा माझा परिचय नसल्यामुळं मला ह्याला तांबूल देण्याविषयीं जरा संकोच वाटतो. ह्या साठीं सखे महाश्वेते, तूंच हा तांबूल आपल्या हातांत घे आणि त्यांना दे. ( हातांत तांबूल घेऊन स्तब्ध बसते. )

चंद्रा०—( आपल्याशीं ) काय चमत्कार आहे पहा.

पद. ( वसंत–त्रिताल. )

सुदैव कालें अनुकूल होई । इच्छित हेतू सिद्धिस जाई ॥ ध्रु० ॥ सप्त सागरा सागुनि वसली । जरि पाताळीं वेष्टित असली । क्षणहि न लागे प्राप्तच होई ॥ १ ॥

असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं, कारण पहा; मी यःकिंचित् राजपुत्र कुठ आणि ही गंधर्वराजकन्या अनेकविधविलासरसांचीखाणी कादंबरी कोणीकडे! परंतु दैवबळाचे योगानें आज मीं त्या सुखाचा अनुभव घेत आहे.

महा०—सखे कादंबरी, आपल्या इथं चालून आलेल्या अतिथीचा सत्कार न करणं हें कांहीं तुजसारख्या उत्तम कुलांतील राजकन्येस योग्य नाहीं. लज्जेचा त्याग करून त्यास तांबूल दे.

कादं०—( गालांत हांसून व वांकड्या दृष्टीनें चंद्रापीडाकडे पाहून ) महाश्वेते तुझी इच्छा आहे तर तसं कां होईना ! ! ( हळूच भीत भीत उठून व पदर सांवरून लज्जेनें किंचित गालांत हांसत व पहात आपला हात चंद्रापीडा पुढें करिते. )

चंद्रा– ( आनंदानें हात पुढें करून तांबूल घेतो व आपल्याशीं ) अहाहा ! !

दिंडी. ( दादरा. )

करस्पर्शानें सौख्य मला होई ॥
प्राप्त दैवानें कसें अहा पाही ॥
धन्य झाला हा देह जन्मुनीयां ॥
अशा आकृतिचा लोभ न हो वाया॥१॥

( इतक्यांत पडद्यांत क्रोधानें ) "हे भर्तृदारिके कादंबरी, सौंदर्याचा खोटा अभिमान बाळगणारा हा दांडगा शुक माझ्या पाठीस लागला आहे, ह्या अधमाचें निवारण तूं कां करीत नाहींस ? हा माझा छळ करीत असतां तूं उपेक्षा करून माझें रक्षण करणार नाहींस तर मी खरोखर प्राणत्याग करीन. हें नीट ध्यानांत धर, आणि असें न करीन तर तुझेच पायांची शपथ."

( सर्व आश्चर्य करितात. )

**महाश्वेता**–( आश्चर्यानें मदलेखेस ) मदलेखे, हा काय चमत्कार आहे !

**मद०**–( महाश्वेतेस ) ऐकावें; हिचें नांव कालिंदी. हिच्यावर कादंबरीचें फार प्रेम आहे. तिनें ह्या परिहास नामक शुकाशीं हिचा विवाह केल्यापासून त्याची ही बायको झाली आहे.

**महा०**–बरें मग त्यांचा कलह होण्याचें कारण काय?

**मद०**–आज प्रातःकाळचे सुमारास हा परिहास

शुक कादंबरीची विद्याचा डबा बाळगणारी दासी जी तमालिका, तिच्याशीं एकांतीं बोलतांना या कालिंदीनं पाहिलं. तेव्हांपासून हिला राग येऊन या शुकापुढं ही जात नाहीं, त्याच्याशीं बोलत नाहीं, व त्याच्याकडे पहात देखील नाहीं. आम्हीं सर्वांनीं तिची पुष्कळ समजूत केली, परंतु व्यर्थ. तिचा निग्रह आहे तो आहेच.

चंद्रा०--( आश्चर्यानें बोलतो ) भगवति, मदलेखा जें सांगत आहे तें सर्व खरें आहे. राजगृहांत कर्णपरंपरेनें हेंच ऐकूं येत आहे; परिजनही असेंच सांगतात; आणि आम्हींही असेंच ऐकिलें. देवी कादंबरीची दासी जी तमालिका तिच्या ठिकाणी वासना धरणारा परिहास शुक कामवश होऊन असलें हें विरुद्ध आचरण करितो. परंतु देवी कादंबरीला हें कसें आवडतें कोण जाणें; ती या दासीचें अशा चापल्यापासून निवारण कां करीत नाहीं? या बिचारीचा अशा दांडग्या शुकाशीं विवाह करून दिला, आतां हिनें काय करावें? ही कालिंदी मोठ्या धैर्याची व प्रौढ विचाराची आहे. कारण असें हिला सापत्न्यरूप दौर्भाग्य प्राप्त झालें असतां हिनें विष भक्षण केलें नाहीं. किंवा अग्नि प्रवेश केला नाहीं. अथवा विरक्त होऊन ही उपास करीत बसली नाहीं. आणि इतकें असून जर ही त्याच्या आर्जवाला भुलून विश्वास धरील, तर हिला धिःकार असो. तिचें तोंड देखील कोणी पहाणार नाहीं.

( हा वृत्तांत ऐकून सर्व आश्चर्य पावतात. इतक्यांत पडद्यांत " हे धूर्ता राजपुत्रा, ही कालिंदी निपुण

आहे आणि मोठी पक्की आहे. जरी ही चपल दिसत आहे, तरी तुजकडून किंवा दुसऱ्या पुरुषाकडून कधीं ही फसली जाणार नाहीं. आणि असल्या प्रकारचीं अलंकारिक व विनोदाचीं भाषणें हिला सर्व कळतात. तर आतां व्यर्थ भाषण करणें पुरे करा. असलीं भुजंगभंगीचीं भाषणें करण्याचें हें स्थल नव्हे. मी मंजुळ भाषण करणारी असून कोप व प्रसाद यांचा काल, कारण, प्रमाण, विषय आणि प्रसंग सर्व जाणत आहे.

( इतक्यांत एक चोपदार प्रवेश करितो. )

चोप०–( महाश्वेतेस प्रणाम करून ) आयुष्मती, देव चित्ररथ आणि देवी मदिरा, तुला भेटावयास तिकडे बोलवीत आहेत.

महा०–( ऐकून ) ठीक आहे. ( कादंबरीस ) सखे कादंबरी, मला चित्ररथाकडील बोलावणं आलं आहे तिकडे मी जातें; परंतु ह्या चंद्रापीडाच्या राहण्याच्या ठिकाणाची योजना कोठें करावयाची?

कादं०–( आश्चर्यानें आपल्याशीं ) ह्या चंद्रापीडास हजारों स्त्रियांच्या हृदयामध्यें राहण्यास जागा पुरत नाहीं काय? ( महाश्वेतेस उघडपणें ) सखे महाश्वेते हें तूं काय बोलतेस? ह्याचं दर्शन झालं त्या वेळेपासून ह्या माझ्या शरीराचाही तोच धनी झाला आहे, मग ह्या मंदिराचा किंवा माझ्या वैभवाचा व माझ्या परिजनाचा प्रभु आहे हें काय सांगितलं पाहिजे? तर याला जिथं राहणं रुचत असेल, अथवा तु-

ज्या अंतःकरणास यानें अमुक ठिकाणीं रहावें असें वाटत असेल, त्या ठिकाणीं यानें रहावें. जिथें राहील तिथें सर्व साहित्याची सिद्धता आहे.

महा०—( चंद्रापीडास ) हे महाभागा—

श्लोक.

प्रमदवन हें शोभे भारी सुरम्य असे किती ॥
सुखद पवनें शांती होई नृपा हृदया प्रती ॥
मणिमय गृहामध्यें राही सुखें करुनी अशा ॥
प्रियजन सदा सेवे आहे सखीसह निरशा ॥१॥

( असें ह्मणून महाश्वेता निघून जाते. )

चंद्रा०—( आपल्याशीं ) अहाहा! किती मी भाग्यवान कीं, ज्या गोष्टीचा सुखानुभव मला स्वप्नांत देखील होण्याची आशा नव्हती, तो आज मी प्रत्यक्ष अनुभवीत आहे. दैवाची गती विचित्र आहे ह्मणून ह्मणतात ती कांहीं खोटी नाहीं. असो, आतां महाश्वेतेनें सांगितलेल्या प्रमदवनांतील मणिमयगृहामध्यें ती येई तों पर्यंत राहिलें पाहिजे. तिची आज्ञा कोण मोडील!

केयू०—राजपुत्रा असें इकडून यावें.

चंद्रा०—( पुढें पाहून आश्चर्यानें ) अहाहा!

पद. (झिंझोटी–त्रिवट–स्फटिकांचें हें पद०)

स्फटिक शिलापथ सुंदर दिसती ॥ रत्न-
मयी जणु दीप उजळती ॥ध्रु०॥ कुंजलता
वनवेष्टित असती ॥ मौक्तिकमाला वल्ली
वरिती॥गृह मणिमय हें शोभतसे अती॥१॥

(असें ह्मणून निघून जातो.)

---

## प्रवेश २ रा.

स्थल—हेमकूट पर्वतावरील गंधर्व राजाच्या
वाड्याचा बाह्य प्रदेश.

(तदनंतर केयूरक प्रवेश करितो.)

केयू०–(आपल्याशीं) भगवति महाश्वेता हिनें हा कमलिनी पत्रांचा पुडा व हीं सुगंधित द्रव्यें देऊन असें सांगितलें कीं, ‘केयूरका, हीं कादंबरीनें दिलेलीं द्रव्यें, तूं क्रीडापर्वतावर मणिमय गृहामध्यें कुमार चंद्रापीड राहिला आहे त्यास नेऊन दे.’ ह्या तिच्या योजनेमुळें चंद्रापीडासही अत्यानंद होऊन कादंबरीचा इष्ट हेतु उघड रितीनें त्यास समजून येईल. कादंबरीचें चित्त चंद्रापीडाचे ठिकाणीं गुंतून राहिल्यामुळें तिला

रात्रंदिवस कांहींच सुचत नाहीं, सदासर्वकाळ ती याच विचारानें झुरत आहे. त्यांतून चंद्रापीड हा उद्ईक महाश्वेतेच्या आश्रमीं परत जाणार असल्यामुळें तिला कांहींच सुचत नाहीं. ( अंमळ विचार करून ) भवितव्यते पुढें उपाय नाहीं. असो, महाश्वेता ज्या अर्थी या सर्व कृत्याला कारण आहे, व भगवतीची मर्जीही कादंबरीवर फार आहे; त्याअर्थी ती कादंबरीचें प्रिय केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. ( इकडे तिकडे फिरून ) आतां चंद्रापीड जरी आपल्या नगराला जाण्याकारितां सिद्ध झाला आहे, तरी भगवतीची आज्ञा तो उल्लंघन करणार नाहीं. ( अंमळ विचारकरून ) असो, आतां चंद्रापीडाकडे जाऊन भगवतीनें सांगितलेला कार्यभाग केला पाहिजे. ( असें ह्मणून जाऊं लागतो व पुढें पाहून ) कोणग ती? मदलेखा? कायग मदलेखे, तूं इतक्या घाईनें तीं मृणालवलयें व शीतलोपचाराचें साहित्य घेऊन कुठंग चाललीस? ( पडद्याकडे कान देऊन व ऐकलेंसें करून ) काय ह्मणतेस? कादंबरीची प्रकृति फार बिघडल्यामुळें तिची शांति करण्याकरितां हीं सर्व द्रव्यें घेऊन हिमगृहाकडे जात आहेस? जा तर लवकर, आणि तिच्या जिवाला आराम पडेल असें कर. मीही क्रीडापर्वतावर चंद्रापीडाकडे जाऊन, भगवति महाश्वेता हिनें सांगितलेला कार्यभाग उरकून लवकरच येतों.

( असें ह्मणून घाईनें निघून जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ—कादंबरीच्या मंदिराजवळील उद्यान प्रदेश.

( तदनंतर मदलेखा व तमालिका बोलत प्रवेश करितात. )

मद०—नंतर मी महाश्वेतेनं सांगितल्यावरून कादंबरीनं दिलेला मोत्यांचा हार व अंगरागानीं भरलेला करंडा घेऊन क्रीडापर्वतावरील मणिमय गृहामध्यें राहिलेला जो चंद्रापीड त्याजकडे गेलें.

तमा०—बरं मग?

मद०—[illegible] हार चंद्रापीडापुढं ठेवून ह्मणालें [illegible], राजपुत्रा, [illegible] आपण [illegible] आणि मनोहर आकृति [illegible] आपणांवर कोणाची प्रीति जडणार नाहीं? आपण [illegible] आह्मां सारख्यास जवळ येण्यास धीट [illegible]. सर्व त्रिभुवनामध्यें ज्याचा महिमा प्रख्यात अशा आपणांसारख्या पुरुषाविषयीं जें जें कांहीं आह्मी अल्पमतीनं ह्मणावं, तें तें अनुचितप्रमाणेंच भासतं. तरी माझी सखी जी कादंबरी तिचं असं ह्मणणं आहे कीं, आपण होऊन ज्यानं माझं अंतःकरण हरिलं व जो माझ्या जीविताचा धनी झाला, त्याला मी काय द्यावं? तर कादंबरी हा हार देण्याच्या मिशानं आपली निर्मल प्रीति आपणांस अर्पित आहे. ह्याजकरितां ही

हारिते ॥ प्रिय विरहानें मन तळमळतें ॥
साहूं कशी हा ताप मनांत ॥ कांहीं सु-
चेना जीव उदासी ॥ १ ॥

मद०—राजकन्ये, आतां दुःख तरी किती कर-
शील? ह्या तुझ्या काळजीनें तुझी पहा कशी अवस्था
झाली आहे ती!

पद. (समज घर गड्या०)

कोमल तनु ही काळजिनें सुकली ॥
वद[illegible]ता आली ॥ सकल हीं दि-
सतीं [illegible] कृश झालीं ॥ तेजी शरीराची
गेली ॥ [illegible] हृदयीं काय अशी जडली ॥
काय मदनानें पिडिली ॥ १ ॥

कादं०—(श्वास टाकून) सखे मदलेखे, कायग करूं? ह्या चिंतेनें माझ्या सर्व देहाची लाही करून सोडिली आहे. मी पुष्कळ प्रयत्न करितें, परंतु हें दुष्ट मन स्वाधीन व्हात नाहीं, ह्याला काय करूं?

पद. (पिलू—ठुमरी—[illegible] कुणा०)

हा मदनताप संताप बहुत चित्तास छळित
बाई ॥ हा फारचि दुःसह होई ॥ स्मरबा-
ण हरी मत्प्राण ॥ वसेना त्राण मदिय
देहीं ॥ वदुं काय सखे या समयीं ॥ या
दया नसे निर्दया करूं काय या सांग कां-
हीं ॥ हा देह नकोसा होई ॥ हा मद०॥ १ ॥

( असें ह्मणून मूर्च्छित पडते. )

मद०—( अंगावरून हात फिरवून ) सखे सावध हो! अशी घाबरी कां झालीस? तूं आपल्या विचारी मनाला इतकं मोकळं कां सोडलंस? तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. महाश्वेतेला तुझी सर्व काळजी आहे.

कादं०—( अंमळ सावध होऊन ) कशाचे बाई माझे मनोरथ पूर्ण होतात! ह्या दुष्ट मदनानं माझा छळ मांडला आहे याला काय करूं?

( पुन्हां स्तब्ध पडते. )

मद०—( आपल्याशीं ) हिला फारच संताप झाला आहे, ह्यामुळं हिच्या मनाला चैन पडत नाहीं. ह्मणून ह्या कमलिनीपुष्पांची शय्या करून त्याजवर हिला स्वस्थ पडूं द्यावी ह्मणजे अंमळ बरं वाटेल. ( असें ह्मणून कमळाचीं पुष्पं आणून त्याची शय्या करून ) कादंबरी, ह्या ठिकाणीं कमळपुष्पांची शय्या तयार केली आहे, त्याजवर पडून विश्रांति घे, ह्मणजे बरं वाटेल.

कादं०—( श्वास टाकून हळूच उठून पुष्पशय्येवर पडते ) बरं तुझ्या मनाप्रमाणं कां होईना!

मद०—( कमलपत्रानें वारा घालते ) राजकन्ये!

पद. ( भैरवी—त्रिवट. )

**कमलदलाचा शीतळ वारा । सुखकर होई कां गे शरीरा ॥ धृ० ॥ रक्तकमलयुत**

रमणिय शय्या । शीतल चंदन सुखवी
हृदया ॥ कमलमृणालें भूषण देहा । शीत
शशीकर तापद कीं हा ॥ जलकणमिश्रित
उडती धारा । रम्य लतागृह सुखवी शरिरा ॥१॥

कादं०—( अंमळ उठून मदलेखेच्या गळ्यांत हात घालून दुःखानें श्वास टाकून ) सखे मदलेखे—

पद. (धनाश्री–धुमाळी–दुःशासन बालक०)

हीं मृणालवलयें तैशीं कमलदलें सुख नच
देती ॥ ही शय्या रुतते बाई श्रम हृदया
फारच होती ॥ विरहानल काया जाळी
स्मरशर हे हृदया रुतती ॥ चाल ॥ प्रिय-
जन तो पाहिन नयनीं । आस ही असे ग
स्वमनीं । हीं सकलहि विषसम मानीं ।
हा प्राण सखे ना जाई ॥ १ ॥

मद०—( डोळ्यांवरून हात फिरवून व वारा घालून ) राजकन्ये सावध हो ! अंमळ विचार कर. महाश्वेतेनं तुझी सर्व काळजी दूर करण्याचं अभिवचन तुला दिलं आहे. ती सर्व प्रकारं तुझं बरं केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. ज्या मदनानं तुझी अशी अवस्था केली, तोच तुला पुढं प्रियकर होईल. तुझा तो मोत्यांचा हार मी चंद्रापीडाचे गळ्यांत घातला, अंगास अंगराग लाविला, व त्याचं मन तुजविषयीं प्र-

२५३६२५

सन्न केलं. महाश्वेताही तिकडे जाणार आहे. तूं स्वस्थ रहा!

**कादं०**-( अमळ लज्जित होऊन ) मदलेखे, तूं ह्मणतेस तसं जरी घडून आलं तरी त्याजबद्दल माझ्या मनाला फार लज्जा उत्पन्न होते. माझं अविचारानं घडलेलं आचरण मला अप्रिय वाटतं, कारण जो पुरुष मी पूर्वी कधी पाहिला नाहीं, ज्या संबंधानं कांहीं ऐकिलंही नाहीं, व ज्याच्याशीं माझा परिचय मुळींच नाहीं, अशा पुरुषाकडे माझं चित्त जाण्यास माझ्या मनांत कांहीं शंका आली नाहीं. ही माझी कृती पाहून जवळच्या स्त्रिया मला लघुहृदया ह्मणतील, हें मी मनांत देखील आणलं नाहीं.

पद. ( कमनारे छुमछुम भात० )

बहु छळी प्रिय प्रेम पाश। मन हरी बहु
आस ग ॥ धृ० ॥ तद्रूप मात हरी देहांत
राही जो। तो न सुखद बहु त्रास गे ॥१॥
भीती अशंका मनीं लज्जा न देहीं जी।
लघुहृया ही खास गे ॥ २ ॥ लोकापवादा
सजी शंका न कांहीं मनीं। प्रेम करी
बहु आस गे ॥ ३ ॥

**मद०**—कादंबरी, तुझं मन त्या चंद्रापीडावर जडलं हें योग्यच झालं, कारण महानदी सागराला सोडून कधींही दूर जाणार नाहीं.

**कादं०**—तें सारं खरं ग, परंतु जें कुमारीभावास व कुलक्रमास विरुद्ध असं अविनयाचं आचरण माझ्या हातून झालं कसं ? माझी प्रियसखी जी महाश्वेता, ही दुःखीत आहे, हें देखील म्या मंदमतीनं मनांत आणलं नाहीं; आणि एकाएकीं त्या पुरुषाच्या स्वाधीन मी आपलं मन केलं. हा माझा वेडेपणा, स्थूलबुद्धि जे आहेत ते देखील जाणतील, मग जिनं मदनवृत्तांत अनुभविला आहे अशा महाश्वेतेला समजेल ह्यांत काय नवल! अल्पपुण्यामुळं सर्व प्रकारं मी आज नष्ट झालें. आज मला मरण येईल तर फार बरं होईल; कारण हें लज्जाप्रद जीवित वारंवार दुःख देणारं आहे. ( अंमळ स्वस्थ होऊन, दीर्घ श्वास टाकून व डोळे पुसून, ) हायहाय ! ! हा सर्व वृत्तांत ऐकून मला आई काय ह्मणेल ? माझा जनिता काय बोलेल ? आणि गंधर्व लोक तरी काय ह्मणतील ? आतां मी काय करूं ? आतां कोणता उपाय करूं कीं ज्याच्या योगानं माझं हें दुष्ट चेष्टित झांकेल ? माझ्या इंद्रियांचं अनिवार चांचल्य कोणास सांगूं ? माझ्या प्रियसखीच्या वृत्तांतामुळं मी तर तशी प्रतिज्ञा केली; आणि केयूरका बरोबरही तसाच निरोप धाडला, परंतु आज ह्या कृतीनं माझ्या सर्व बोलण्यावर पाणी पडलं !

( पुनः स्तब्ध होते )

**मद०**—( अंगावरून हात फिरवून व वारा घालून ) कादंबरी तूं ह्याचं किमपीही दुःख मानूं नको. तुझ्या मनाप्रमाणं सर्व घडून येईल. चंद्रापीडाची व महाश्वे-

तेची चांगली ओळख आहे; आणि तिची आज्ञा तो कधींही मोडणार नाहीं.

कादं०–( दुःखानें श्वास टाकून ) सखे मदलेखे, हा वंचक चंद्रापीड ह्या ठिकाणीं कोणी आणला? धूर्त दैवानं, किंवा गर्विष्ट मदनानं, किंवा पूर्वीच्या पापसंचयानं, किंवा दुष्ट मृत्यूनं, हें कांहींच कळत नाहीं. किंवा हा माझी विटंबना करण्या करितांच येथें आला. मीही मूढ स्त्रीपणानं वशंगत झालें; पण तो चपळ धूर्त मला नको. मला त्याची काय गरज आहे? त्याचं मला प्रयोजन तरी काय?

( इतक्यांत तरलिका प्रवेश करिते. )

तर०–राजकन्ये, महाश्वेतेचा तुला असा निरोप आहे कीं "सखे कादंबरी, जसा चंद्रकांतमणी चंद्रकिरणाच्या स्पर्शानं द्रवतो, तसा हा चंद्रापीड तुझ्या गुणांच्या योगानं द्रवून तुझ्याशीं उघड रीतीनं बोलावयास समर्थ होत नाहीं; परंतु ह्या राजकुमाराच्या मनांत परत जावं अशी इच्छा उत्पन्न झाली आहे, कारण कीं ह्याला मागून आलेल्या राजमंडळास ह्याचा ठिकाण लागत नसल्यामुळें फार दुःख होत असेल, तूं ह्याजकरितां एक वार ह्याला भेटून परत जाण्याविषयीं निरोप दिला पाहिजे."

कादं०–( दुःखानें श्वास टाकून ) काय, माझ्या करितां चंद्रापीडाचीही मजप्रमाणेंच अवस्था झाली आहे काय? मी निर्दयी खरी, कारण मजकरितां जर इतर

जनाला दुःख होत असेल तर ही अभागी जन्मास तरी कशाला आली! ( स्तब्ध रडते )

**मद०**—कादंबरी, आपल्या मनाशीं कांहीं विचार कर. महाश्वेतेची आज्ञा मोडतां कामा नये, तर चल आपण तिकडे जाऊं.

**काद०**— मदलेखे, मी आपल्या, सर्व परिवारासह आपल्या अंतरात्म्या प्रमाणें ह्या राजकुमाराच्या स्वाधीनच आहें, मग इतका अनुरोध तो कशाला पाहिजे? त्याच्या इच्छेविरुद्ध वागण्यास कोण बाई समर्थ आहे! ठीक आहे; चल तर. ( असें ह्मणून हळूच उठून व श्वास टाकून ) बाई मदलेखे—

श्लोक. ( हरिणीवृत्त. )

**तरुणपण हें दुःखा देई न सौख्य मनीं वसे ॥**
**सतत हरिते चिंता देहा विकार करीतसे ॥**
**कुसुमशरही पीडा देती तशांत रुखे अहा ॥**
**हरहर! कशी शांती राही सदा विरही महा॥१॥**

( असें ह्मणून मदलेखा व कादंबरी निघून जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

---

**स्थळ– अच्छोद सरोवराचा बाह्य प्रदेश.**

( तदनंतर चंद्रापीड, पत्रलेखा व सेनापति बलाहक प्रवेश करितात. )

पद. ( माडिवरि चलग गडे० )

गंधर्व लोक पाहुनियां मि सुखावलों ॥
लावण्यरूप सुस्वरूप भुलुनि गूंतलों ॥
आनंद सुखद राज्यभोग त्यजुनि राहिलों ॥
मद्देशीं प्रिय तात बंधु सर्व विसरलों ॥१॥

बलाहका, सर्व परिजनासहवर्तमान माझा पिता; आणि सर्व अंतःपुरांतील स्त्रियांसहवर्तमान माझी माता खुशाल आहेना? तसेंच वैशंपायनाचा पिता शुकनास व माता मनोरमा हीं देखील कुशल आहेतना? आमच्या बद्दल त्यांना वारंवार स्मरण होत असेल! आह्मी फार दिवस प्रवासांत राहिल्यामुळें त्यांचें चित्त ठिकाणीं नसेल! सांग सांग, माझ्या पित्याची आणखी काय आज्ञा आहे?

बला०—महाराज, राजाधिराज देव तारापीड व राणी विलासवती, त्याच प्रमाणें प्रधान शुकनास व मनोरमा हीं सर्व परिजनासह खुशाल आहेत. ( जवळ असलेला लखोटा काढून चंद्रापीडापुढें टाकितो. )

चंद्रा०–( आनंदानें पत्र हातीं घेऊन वाचितो. )

पद. ( मालकंस–त्रिवट. )

"स्वस्तिश्री प्रिय प्राण कुमारा। चंद्रापीडा सौख्यसागरा ॥ धृ० ॥ सागुनि आह्मां जाशी विपिनीं। दिवस कंठिले मन आंवरुनी। सर्व प्रजाजन दुःखी स्वमनीं। तव दर्शनसुख देई कुमरा ॥ १ ॥

( सेनापतीस ) सेनापति, तूं उज्जयिनीस जाऊन मी येणार असल्याचें वर्तमान तात महाराजांस सांग.

सेना०–( नम्रतेनें प्रणाम करून ) जशी आज्ञा.

( असें ह्मणून निघून जातो. )

चंद्रा०–( आपल्याशीं विचार करून ) आतां काय करूं ! तिकडे तात महाराजांची आज्ञा मला मोडवत नाहीं. आणि इकडे गंधर्वराजकन्या कादंबरी हिच्या वरील प्रेमा मला अन्यस्थळीं चैन पडूं देत नाहीं ! ( अंमळ विचार करून ) मी उज्जयिनी सोडून आल्यादिवसापासून परत गेलों नसल्या कारणानें, माझी माता वारंवार मला आठवून दुःख करीत असेल. तात काय ह्मणेल ! प्रजाजनही काय ह्मणतील ! ( पुनः थांबून व विचार करून ) तिकडे कादंबरी, महाश्वेता वगैरे काय करीत असतील ! तो हेमकूट मला पुनः केव्हां दृष्टीस पडेल ! हायहाय ! आतां काय करूं ! कादंबरीच्या विरहामुळें हल्लीं मला कांहींच सुचत नाहीं.

पद. ( कोण तुजसम सांग० )

देत स्मर संताप अति हृदयाला। चितानी तनुला॥ पोळते नच शांती या शरिराला। विरहें मन्मतिला ॥ होत सुखकर भोग विषसम मजला। कांहीं न प्रिय याला ॥ कामिजनमानसास आनंदाला। रुपवती अबला ॥ १ ॥

मी उज्जयिनीस गेल्यावर कादंबरीकडील वर्तमान मला कोण सांगेल; आणि माझें येणें तरी ह्या प्रदेशीं कसें होईल ! ( चिंतन करीत स्तब्ध बसतो इतक्यांत केयूरक प्रवेश करितो. )

केयू०—( प्रणाम करून ) महाराजांचा विजय असो.

चंद्रा०—( अकस्मात आलेल्या केयूरकाकडे पाहून उत्सुकतेनें. )

साकी. ( धुमाळी. )

हा सखया ! ये प्रेमपुरःसर आलिंगन सुख देई ॥ विरहव्यथा ही दुःसह झाली हृदया शांति न होई ॥ सांगुनि वृत्तांता । हितगुज प्रिय तें मच्चित्ता ॥ १ ॥

( असें ह्मणून केयूरकास प्रेमानें आलिंगन देतो. ) बा केयूरका, तुझ्या दर्शनानें परिवारासह देवीचें कुशल आहे हें तर कळलेंच; परंतु देवी कादंबरीचा, मदलेखेचा अथवा महाश्वेतेचा मला कांहीं निरोप आहे काय ?

केयू०—महाराज, मी काय विज्ञापना करूं ? देवी

कादंबरीचा, मदलेखेचा अथवा महाश्वेतेचा आपल्यास तिळभर सुद्धां निरोप नाहीं. ज्यावेळीं आपण इकडे निघून आलांत, त्यावेळेस मी, महाराज उज्जयिनीस गेल्याचें वर्तमान त्यांना सांगितलें; तत्क्षणीं वर पाहून दीर्घ श्वास टाकून मोठ्या खेदानें 'बरें असें काय ?' असें बोलून महाश्वेता उठून पुनः आपल्या आश्रमांत तपश्चरणार्थ गेली !

चंद्रा०–( दुःखानें ) काय, महाश्वेता कादंबरीला सोडून तपश्चर्या करण्याकरितां आपल्या आश्रमीं गेली ! बरें मग ?

केयू०–कादंबरी ही अकस्मीत झालेल्या दुःखानें पराभूत झालेलीच काय, किंवा मूर्च्छा पावलेलीच काय, अशी होऊन महाश्वेता केव्हां गेली हें देखील तिला समजलें नाहीं. अशा स्थितींत ती बराच वेळ स्तब्ध राहिली; व किंचित डोळे उघडून उद्विग्नेप्रमाणें मला 'महाश्वेता कोठें आहे ?' असें रागानें विचारीत मदलेखेकडे वळून तिला मोठ्या निराशेनें ह्मणाली 'मदलेखे, कुमार चंद्रापीडाप्रमाणें आजपर्यंत कोणी तरी केलें आहे काय? किंवा पुढें कोणी तरी करील काय? ? असें बोलून आपल्या प्रमाणेंच दुःखांत झालेल्या मदलेखे बरोबरही कांहीं भाषण न करितां स्तब्ध झाली. ( किंचित दुःखानें ) महाराज, आपल्यासाठीं कादंबरी फारच कष्ट भोगीत आहे. फार काय सांगूं !

पद. ( बघुनि उपवना )

**विरहव्यथाही दुःसह भारी ताप सदा देहीं ॥**

स्मरसंतापें काळिज जळतें सौख्य कसें होई ॥
पुष्पसुगंधित मलयानिल तो इंदुकर न सुखवी॥
प्रमद वनांतिल लताकुंजही कमलदलें लाही ॥
चल—तव विरहव्यथा ही पीडा बहु देतसे ॥
सा योग हृदयीं कासाविस होतसे ॥
तो प्रियजन नगहीं तुच्छ तिला होतसे ॥
मूर्ति नृपा तव आणुनि ध्यानीं कष्टतसे पाहीं ॥
तेजरहित ती काया झाली कां न दया तुजही॥१॥

चंद्रा०—( मोठ्या कष्टानें दीर्घ श्वास टाकून ) वा केयूरका, त्या गंधर्वराजकन्येची अशी दुःखद स्थिति झाली काय? त्या दुष्ट मदनाला धिःकार असो; कारण जी अबला तिला देखील. त्या दुष्टानें त्रास दिला! ( अंमळ विचार करून ) त्याचा तरी काय दोष! या सर्व दुःखाला मीच कारण आहे. आईबाप, बंधुवर्ग, प्रियजन, ह्या सर्वांस दुःख देणारा हा अभागी चंद्रापीड कशाला जिवंत राहिला! ( पुनः थांबून विचार करून ) ह्या मदनानें तरी हा मजवर उपकारच केला म्हणावयाचा. कारण पहा—

पद. ( पांडु नृपति जनक० )

निशिदिनिं स्मर ताडितो । प्रिय मजला
तो गमतो । विरह व्यथें कष्टवितो । प्रिय-
जनास कीं ॥ १ ॥ मन साठीं ती सुदती ।
व्यर्थ मनीं झुरत अती । प्रेम पाश दृढ अ-
सति । साहवे कसे ॥ २ ॥

केयू०—महाराज, प्रियजनाच्या समागमाची आशा ही अशी कांहीं बळकट आहे कीं, अतिशय वेदनांनीं मनुष्याचे प्राण जरी विव्हळ झाले असले, तरी त्यांस ती धरून ठेविते! महाराज, मी काय करूं? तिची ती बळकट उत्कंठा मी कशी सांगूं? कोणत्या तऱ्हेनें उघड करूं? महाराज, निद्रेमध्यें प्राणी वेदनारहित होतात हें तर खरेंना? परंतु ती तर प्रति दिवशीं तुह्मांला निद्रेंतसुद्धां पाहते! असें असतां तुह्मी तिच्या विषयीं कांहींच विचारपुससुद्धां करीत नाहीं! त्या दुष्ट मदनबाधेनें तिला फारच त्रास दिल्यामुळें ती कादंबरी मोठ्या दुःखानें एकेक दिवस लोटत आहे.

चंद्रा०—(मोठ्या दुःखानें श्वास टाकून व केयूरकाला मिठी मारून) सख्या केयूरका,

पद. (असावरी—त्रिवट—जाई परतोनी बाळा०)

काय अशी झाली। कुदशा। दुष्ट मदन हा देह गांजिलो। कां न दया आली॥सखया॥ धृ०॥विरही जैसा मी तन्मम ती। विरही बहु झाली।सखया०॥निष्ठुरता मम व्याधि असे तिस दुष्ट दशा आली। सखया० ॥ काय करूं मी परवशता ही दुःखद ही बनली ॥ कुदशा ॥ १ ॥

सख्या केयूरका, कादंबरीनें तुला कांहीं ही आज्ञा केली नाहीं? त्याप्रमाणेंच महाश्वेतेनें किंवा मदलेखेनेंही

कांहीं निरोप सांगितला नाहीं ? ( विचार करून पुनः दुःखानें ) केयूरका, तुझी देवी पडली चांगल्या कुळांतली, तशीच उदार, मोठ्या मनाची; आणि अत्यंत कोमल स्वभावाची असल्यामुळें तिचें कर्तव्य तिला समजत नाहीं. अरे पहा चंद्रमूर्तीच्या किरणानें विरघळून जाणें हें चंद्रकांताच्या स्वाधीन आहे खरें, पण तिचे कर आपणाकडे ओढून घेणें हें काम त्याचें नाहीं. बा केयूरका, आह्मीं तेथें जाईतोंपर्यंत तरी देवी कादंबरी आपले प्राण राखून ठेवील का ? किंवा मदलेखा तरी तिच्याशीं दोन विनोदाचीं भाषणें बोलण्यास समर्थ असेल का ? किंवा महाश्वेता तरी तिचें थोडेंबहूत सांत्वन करायला पुनः तेथें येईल का ?

केयू०—महाराज, धैर्य धरून आपण तिकडे चला, तुमच्या दर्शनाविषयींची तिची उत्कंठा तिला क्षणभर सुद्धां झोंप येऊं देत नाहीं ! तिला सर्व उदास होऊन गेलें आहे, अजून तिचें जीवित मात्र कंठाच्या बाहेर गेलें नाहीं एवढेंच काय तें ! महाराज तिला आश्वासन द्यावयाला अगोदर लवकर गेलें पाहिजे. मी येथें उगाच कशाला राहूं ? महाराजांचें अंतःकरण तर तिकडे गेलेंच आहे, तर कृपा करून महाराजांनीं मला अगोदर जाण्याची आज्ञा द्यावी.

चंद्रा०—( आनंदानें )केयूरका, तुझ्या प्रमाणें आह्मांवर निष्कपटभक्ति तरी कोणाची आहे ? तेव्हां " मी अगोदर लौकर जातों " ह्मणून ह्मणतोस हें उत्तम आहे. तर तूं जा; आणि आमच्या आगमनाविषयीं तिला दृढ

विश्राम उत्पन्न होईल असें कर. पत्रलेखेलाही तुझ्या बरोबर देवीच्या चरणाजवळ पाठवितों. हिला पाहूनही देवीला बराच धीर येणार आहे. ( पडद्याकडे पाहुन ) मेघनादा, तूं या पत्रलेखेला व केयूरकाला त्यांच्या मार्गापर्यंत नेऊन पोंहोंचीव. मी उज्जयिनीस जाऊन मातापित्यांचें दर्शन घेऊन परत लवकरच तिकडे येतों.

मेघ०—( पुढें होऊन ) महाराज आतां विलंब कशाला ? मला आज्ञा व्हावी.

चंद्रा०—( सद्गदित होऊन व केयूरकास मिठी मारुन ) केयुरका, तूं तर देवीकडून कांहींएक निरोप आणला नाहीस ! मग तुझ्याबरोबर देवीला योग्य व अपूर्व असा मीं तरी काय बरें निरोप सांगावा ? ही पत्रलेखा देवीच्या चरणमूलाजवळ जातच आहे हीच माझी कायती तिला विनंती कळवील ह्मणजे झालें ! ( पत्रलेखेकडे पाहून ) पत्रलेखे, या केयुरकाबरोबर तूं हेमकूटावर असणाऱ्या गंधर्वराजकन्येकडे जा; आणि तिचें सर्व प्रकारें शांतवन कर. ती कादंबरी फार ममताळू आहे. तला कोणत्याही प्रकारचा त्रास देणार नाहीं मी लौकरच तिकडे येतों. तूं कांहीं काळजी करूं नको ?

पत्र०—( दुःखानें डोळ्यांत अश्रू आणून व दीर्घ श्वास टाकून. )

पद. ( भैरवी—त्रिवट. )

**जाऊं कशी मी त्या परसदना ॥ त्यागुनि**

सदया मत् सुख सदना ॥ धृ०॥ साहुं क-
शी मी या विरहाला । हितगुज आपुलें
सांगु कुणाला ॥ निष्ठुर तुह्मी आजि कां
झालां ॥काय करूं मी ध्यानीं आणा ॥१॥

चंद्रा०—( पत्रलेखेस जवळ घेऊन प्रमानें )
पत्रलेख,—

पद. ( भैरवी-त्रिवट )

विरहें व्यर्थ अशी दुःखी होशी । स्वमनीं
हळहळशी ॥ धृ० ॥ शांतपणानें जाउनि
आतां । कादंबरिचे दुःखित चित्ता । शांत
करिगे माझ्याकरितां । न करी शोक मनीं
सुख हो तुजशी ॥ स्वमनीं० ॥ १ ॥

पत्र०—( दुःखानें श्वास टाकून व डोळे पुसून )
महाराज, मी गेल्यापासून जर कादंबरीचें शांतवन हो-
णार असेल; आणि त्यापासून जर आपल्याला सुख
होणार असेल, तर कांहीं दिवस आपला वियोग मी
सुखानें सहन करीन! मात्र आपलं दर्शन लवकर
झालं पाहिजे.

चंद्रा०—पत्रलेखे, तूं कांहीं काळजी करूं नको.
मी मातापित्यास भेटून परत लवकरच येईन बरें! मी
असाच कादंबरीकडे आलों असतों; परंतु फार दिवस
झाले, तिकडे माझीं मातापिता वाट पहात असतील,
त्यांच्या जिवाला दुःख देणें हा पुत्रधर्म नव्हे. तूं ह्या के-
यूरकाबरोबर जा. तो तुझी व कादंबरीची ओळख क-

रून देईल. आणि तूं मजविषयींची सर्व हकीगत कादंबरीस सांगून तिच्या दुःखी मनाला करमणूक कर. आणखी मी तुला जें सांगतों हें लक्ष्यांत ठेव व या प्रमाणें वागत जा.

पद. ( भैरवी-दादरा )

हितगुज आपुलें ध्यानीं धरावें। आनंदानें
दिन कटावे ॥ ध्रु० ॥ रक्षण तनुचें नित्य
करावें। प्रेम पुरस्सर हित चिंतावें। कु-
मार्ग वर्तन सागुनि द्यावें। सज्जन समुहा
प्रियकर व्हावें। योग्य विचारें स्थल शो-
धावें। निंद्य जनातें सोडुनि द्यावें ॥ १ ॥

( केयूरकास ) केयूरका, हिला नीट संभाळून ने बरें; आणि मला नेण्याकरितां हिला बरोबर घेऊन, तेथून महाश्वेतेच्या आश्रमापर्यंत अगत्य ये.

केयू०—ठीक आहे महाराज, आपण कांहीं काळजी करूं नका.

पत्र०—महाराज, मजवर लोभ असावा.

चंद्रा०—हें काय सांगावयाला पाहिजे—

साकी. ( घुमाळी. )

प्रिय मजला तूं सदैव असशी विरह कधीं
तुज नाहीं ॥ अल्प काळ पर्यंत जाउनी
कार्य सफलता पाही ॥ १ ॥

चौथा अंक समाप्त.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

### स्थळ— तपोवनाचा बाह्य प्रदेश.

( तदनंतर दोघे ऋषिकुमार बोलत प्रवेश करितात. )

पहिला—सख्या पैलवा, जाबालीमहर्षीनीं सांगितलेली मनोहर रसभरित कथा ऐकून मला फार आश्चर्य वाटलें ! त्या महाश्वेतेच्या उग्र शापामुळें, त्या बिचाऱ्याला अशा तऱ्हेनें दुःख भोगावें लागलेंना? बरें ह्याचा पूर्व वृतांत गुरुजीनीं काय सांगितला ?

दुसरा—तो शुक गतजन्मीं ऋषिपुत्र असतां, कालगतीनें कामवश होऊन, आपल्या दांडगेपणामुळें दिव्यलोकाहून मनुष्यलोकीं, उज्जयनीचा राजा जो तारापीड त्याच्या प्रधानाचा पुत्र वैशंपायन नामें झाला.

पहिला—( दुःखानें ) शेवटीं त्या ऋषिकुमारास आपल्या दोषाचीं फळें भोगण्याकरितां जन्म घेणें भाग पडलेंना ! बरें मग ?

दुसरा—त्या जन्मींही त्यानें आपलीं इंद्रियें स्वाधीन न ठेविल्यामुळें; आणि आपल्या पित्याच्या अत्यंत कोपामुळें, त्या सत्यनिष्ट महाश्वेतेच्या उग्र शापास पात्र होऊन, ह्या शुकयोनींत उत्पन्न झाला.

**पहिला**—( आश्चर्यानें ) पैलवा, हा मुनिकुलांत उत्पन्न झाला असून कामाधीन कसा झाला ? आणि त्याचें दिव्यलोकीं वास्तव्य असतां, ह्याला इतकें अल्प आयुष्य कां झालें ?

**दुसरा**—ह्याचें कारण अगदीं स्पष्ट आहे. अरे, काम, प्रीति, मोह इत्यादिकांनीं युक्त व अल्पायु जें स्त्रीवीर्य त्या पासून ह्याचें जन्म झालें आहे. ह्यास,— " यादृशा ह्येव जायते तादृशैव भवति " असें श्रुति-वचनही प्रमाण आहे. जगतांतही जसें कारण असतें, तसें कार्य घडतें; असें ह्याचें जन्म आहे, म्हणून हा कामातुर झाला; आणि कामाच्या वेदनेंत असतां मरण पावला. आतां ह्या जन्मींही ह्याचें आयुष्य अल्प आहे. शाप संपतांच ह्याचें आयुष्य दीर्घकाल होईल.

**पहिला**—मग ह्याच्या पित्यानें पुत्राच्या दुःखाचें निवारण होण्यासारखें कांहीं सत्कार्य कां केलें नाहीं ?

**दु०**—पुत्राची ही स्थिति पाहून त्या महर्षीला फार वाईट वाटलें; परंतु हा पश्चात्तापाशिवाय ताळ्यावर येणार नाहीं, व शाप संपेपर्यंत त्याला कांहीं करितां येत नाहीं म्हणून स्वस्थ राहिला. आतां ह्याचा शाप संपण्याचा काळ अगदीं जवळ आला आहे, असें जाणून ह्याची माता जी लक्ष्मी हिनें ह्याला पश्चात्ताप होऊन ताळ्यावर येण्याकरितां अमंगल चांडालकुलांत जन्म घेतला आहे, व पुढील कृत्यांत ती गुंतली आहे; आणि

ह्याच्या समाचाराकारितां त्याचा मित्र जो कपिंजल तोही आमच्या गुरुजीच्या आश्रमांत आला होता.

( पडद्यांत ) " अहो महाजनहो दूर व्हा. मी चांडालकन्यका आहें, माझ्या अमंगल छायेनें आपल्या पवित्र देहास विटाळ होईल. ह्या करितां मार्ग सोडा."

पहि०–( ऐकून व इकडे तिकडे पाहून ) पैलवा, ही पहा कोणी चांडालकन्यका हातांत शुकाचा पिंजरा घेऊन इकडे येत आहे, तर आपण जाऊं; नाहीं तर आपल्यास तिचा स्पर्श होईल.

दुसरा–( आकाशाकडे पाहून ) काय, आपल्या बोलण्याच्या नादांत इतका उशीर झाला ! हें पहा—

पद. ( भूपकल्याण प्रिये पहा रा० )

पहा नभीं चंद्रप्रभा तेजरहित धवल मूर्ति
शोभते ॥ धृ० ॥ उदयाचलिं अरुण येत ।
तारांगण अस्त होत । शीत मंद पवन
सुटत । सहज सुखद भासतें ॥ १ ॥

( असें ह्मणून दोघेही निघून जातात. )

## प्रवेश २ रा.

### स्थळ—राजमार्ग.

( तदनंतर चांडालकन्यकेचा वेष घेतलेली लक्ष्मी हातांत शुका-
चा पिंजरा घेऊन प्रवेश करिते. )

चांडालकन्यका—( दुःखानें श्वास टाकून. )

पद. ( मांड—धुमाळ. )

दुर्मिळ जीवित झालें ।
क्षणभंगुर जग हें बनलें ॥ धृ० ॥
दैवबळें मन दुःखी होई ।
संचित आपुलें कारण पाही ॥
दुष्ट रिपू बहु गांजिति देहीं ।
दुःख सुखें जग भोगित राही ॥
हा जगदीशा ! हाय परेशा ॥
हा यतिभूषा ! नाशि तमातें ॥ १ ॥

( इकडे तिकडे फिरून आपल्याशीं ) हाय हाय !
काय दैवगति विलक्षण आहे पहा !! ( पिंजऱ्याकडे
पाहून ) हा माझा प्रियपुत्र पुंडरीक; आणि मी त्याची
माता लक्ष्मी !!! माझ्या नशिबीं चांडाळजातींत उ-
त्पन्न होऊन, पुत्राचें जीवित रक्षण करण्याचें कार्य
यावें ना ? हरहर ! मायापाश मोठा कठीण आहे !!

(अंमळ थांबून विचार करून) हजारों पुण्यकर्मांनीं प्राप्त होणारा मनुष्यजन्म फार दुर्लभ आहे. ह्यांत सर्व जातींत उत्तम जें ब्राह्मणत्व तें मिळणं कठीण; मुनित्व प्राप्त होऊन दिव्य लोकीं वास तर परम दुर्लभ आहे! असं असतां ह्यानं पूर्वसंचिताच्या दोषानं, कामवश होऊन आपल्या आत्म्याला सर्व क्रियाविहीन अशा ह्या शुकयोनींत आणलं! अहो ह्या मंद पुण्याचे घर्माचा काय तरी भयंकर परिणाम! (पिंजऱ्यांतील शुकाकडे पाहून) पुत्रका, भला सांपडलास, आतां कोठें पळशील? आतां स्वच्छंदानं फिरणं वगैरे सर्व गेलं. तुझ्या कर्मानेंच ही कुदशा तुला प्राप्त झाली! त्या वेळींच जर मनाला आटापून धरलं असतंस तर हे क्लेश कां झाले असते? परंतु—

पद. (लावणीचे चालीवर.)

दुष्कर्म वनीं भृंग भृंग मन जडलें कीं ॥
सत्कर्म भंग निस्संग होउनि भुलशी कीं॥ध्रु.॥
तप-ध्यान कर्म हीं नष्ट भ्रष्टता वरिली कीं ॥
स्मर चाप मारितां शाप तापशी हृदयीं कीं॥
तव पूर्वपुण्य हें जाण म्हणुनि हे प्राण राहती कीं॥
भ्रम सर्व सोडुनी स्मरे शिवाच्या चरणा कीं ॥१.

(इकडे तिकडे फिरून अंमळ थांबून विचार करून) असो. आतां ह्याला ह्याच्या मित्राकडे नेऊन उभयतांची भेट केली पाहिजे. त्याचाही शाप संपण्याचा सम-

स अगदीं जवळ आहे. तर आतां विलंब न लावितां तिकडेच जावें!

( "दुर्मिळ जीवित झालें॥ क्षणभंगुर जग हें कन-ळें" हें पद्य ह्मणत निघून जाते. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—हेमकूट पर्वत, कादंबरीचें अंतःपुर.

( तदनंतर पत्रलेखेच्या खांद्यावर हात टाकून स्वस्थ बसलेली व दुःखानें व्याप्त अशी कादंबरी प्रवेश करिते. )

कादं०—पत्रलेखे,

पद. ( सिंद घुमाळी. )

या हृदयाचा पूर्ण विसांवा सुखद मनातें
अती॥ विरह हा सोसावा गे किती॥ धृ०॥
रूप तेज तें स्वमनीं भरलें मोह पडे अंतरीं॥
रुचेना कांहिं सखे मंदिरीं॥ १॥ प्रेम-
बंधनें दुर्लभ होती क्लेश तयानें महा॥
दिवस हे कंठुं कशी मी अहा॥ २॥

अग पत्रलेखे, ज्या पुरुषामुळं मला तूं दर्शन झाल्यापासून प्रिय झाली आहेस, त्या पुरुषाहून आई किंवा बाप, महाश्वेता किंवा मदलेखा, किंबहुना माझं जीवितही मला प्रिय नाहीं. माझं अंतःकरण तुझ्यावरच विश्वास धरीत आहे, ह्मणून मला होत असलेला असह्य दुःखभार आज एक वेळ तुला कळवावा; आणि नंतर आपलं जीवित टाकावें, असा मी निश्चय केला आहे; परंतु काय करूं! आधीं बोलावयास मला लाज वाटते! हा वृत्तांत ज्या ह्या माझ्या अंतःकरणानं जाणला आहे, त्यापासून देखील मी लाजत होतें, मग अग पत्रलेखे, दुसऱ्या पासून लज्जित होतें हें काय सांगायला पाहिजे? मी होऊन तिकडे जावं तर हें मला दूषण लागेल. आणखी तुला सांगतें—

पद. (मी हे जलत०)

प्रियजन सदैव प्रिय असती। थोर कुलांतील जन्म असे मम। निंद्य कर्म हे जन ह्मणती ॥ धृ० ॥ भंग करी स्मर विनय गुणादिक कुलकलंक हा निंद्य अती ॥ १ ॥ मीच मनानें वरिलें त्यातें काय नसे मज धाक भिती ॥ २ ॥

पत्र०—कादंबरी, मला काय आज्ञा करावयाची असेल ती कर, मी ऐकावयास सिद्ध आहें. कुमार चंद्रापीड ह्यानं काय केलं? तुझा कोणता अपराध

केला? अथवा कोणत्या अविनयानं देवीचं कोमल अंतःकरण त्यानं दुखविलं? हें एकून घेऊन प्रथम मी आपल्या जीविताचा त्याग करितें, मग तुला आपल्या प्राणाचं काय करणं असेल तें कर.

कादं०—पत्रलेखे, (दुःखाचा श्वास टाकून)

गज्जल.

प्रिय मूर्ति ती हृदयीं वसे बहु ताप हा होई ॥ नच गे कधीं शांती, करावें कसें बाई ॥ १ ॥ सहवास त्याचा सौख्य दे परि लाभ हा नाहीं ॥ असुखी सदां तेणें वियोगें मनीं काही ॥ २ ॥

पत्र०—(आपल्याशीं आनंदानें) ह्या कादंबरीचं मन निःसंशय चंद्रापीडावर बसलं, ही गोष्ट खरोखर फारच उत्तम झाली. आतां जर खरंच कादंबरीच्या मिषानं साक्षात् कामदेवाचीच अंतःकरणवृत्ती चंद्रापीडावर प्रसन्न झाली असेल, तर त्याचे साहजीक व संवर्धित जे गुण, त्यांनीं त्याजवर मोठाच प्रत्युपकार केला. (उघड कादंबरीस) कादंबरी, तूं सांगतेस ही गोष्ट जर खरी आहे, तर क्रोध टाकून दे; आणि प्रसन्न हो. मदनानं केलेले अपराध देव चंद्रापीडावर लावून त्याच्या योगानं त्यास दूषित करावं, हें तुजसारख्या कुलस्त्रियेस योग्य नाहीं. हा दुष्ट मदन मोठा धूर्त आहे.

कादं०—सखे पत्रलेखे, तूं ह्मणतेस तें खरें—

पद्द. ( सकल जनां सारखे बंधु. )

कठिण सखे मदनशरमार ।
होई ग ताप जीवा ॥ धृ० ॥
पुष्पमयी वपु केवल असुनि ।
तापवितो तनु फार ॥ कठि० ॥१॥
अदय मदन हा जीवित हरितो ।
हृदयव्यथा अनिवार ॥ कठि० ॥

पत्रलेखे, चंद्रापीडाच्या ठिकाणीं माझी प्रीति जडून मदनानें माझी ही दशा केली आहे ह्यांत संशय नाहीं. तूं तर माझ्या अंतःकरणाहून वेगळी नाहींस म्हणून तुला मी सांगतें कीं, जें माझ्या चित्तास योग्य त्याचा मला तूं उपदेश कर. माझ्या अवस्थेमुळें सांप्रत गुरुजनांनीं दोष देण्यास पात्रभूत आणि लज्जायुक्त अशी मी झालें आहे अशा मला जिवंत राहण्यापेक्षां मरणच येईल तर बरं.

पत्र०—कादंबरी, कारणावांचून इतका मरणाविषयीं अतिशयित आग्रह कशाला पाहिजे? आराधन केल्यावांचून प्रसन्न झालेला जो भगवान कामदेव त्यानेंच तुला हा वर दिला आहे. मी तुझ्या पांयांची शपथ वाहून सांगतें मला आज्ञा कर, मी अशीच जातें आणि तुला अति प्रिय जो चंद्रापीड त्याला घेऊन येतें.

कादं०—( सद्गदित होऊन ) पत्रलेखे—

पद. (प्राणी तूं हरसे हरे)

मद्भाग्य सखये कसलें ।
प्राण विसावा प्राप्त कशाचा ।
व्यर्थ मनीं मी वरिलें ॥ ध्रु० ॥
हृदयीं भूल स्वरूप गुणानें ।
चपल मनानें हरिलें ॥ १ ॥
न दिसे आस उगिच झुरे मी ।
सकलही साधन सरलें ॥ मद्० ॥२॥

पत्रलेखे, तूं जरी त्या कुमाराला इकडे आणलंस, तरी ही माझी लज्जा, माझ्या चंचलतेला लाजल्यामुळंच काय नकळे, त्याचं मला दर्शन होऊं देणार नाहीं. त्याची इच्छा नसतां त्याला आणलंस ह्या अपराधाला भ्याल्यामुळंच काय, माझी ही भीति त्याच्या दृष्टी-पुढं देखील मला उभी करणार नाहीं! फार काय सांगूं? त्या कुमाराला ह्या स्थलीं आतां आणलंस, तरी त्याचा मला कांहीं एक उपयोग होणार नाहीं. तूंच सांग, त्याला इकडे येण्याला अधिक तें काय आहे? तीच ना ही मी कादंबरी? व तुझा कुमारही तोच ना? जी मी त्या-जकरितां दुःख करीत आहें, त्या मला दर्शन न देतां परत स्वगृहीं गेला, तर अज्ञजनाची विटंबना करणारा, फसविणारा, तुझा कुमार कशाला बाई इकडे आणतेस? (असें ह्मणून स्तब्ध होते.)

पत्र०—देवी प्रसन्न हो, शुद्धीवर ये, व्यर्थ खेद करूं

नको. हृदयाला दुःख देणारा हा संताप आतां उगाच कशाला? रागाचा वेग आटोप. ही मी चंद्रापीडाला घेऊन आलेंच पहा.

कादं०—( दुःखानें )पत्रलेखे, मी तुझ्या तोंडावर गोड बोलतें असं नाहीं; पण खरं ह्मणशील किंवा तर मी जी अजून जिवंत आहें, ती तरी तुझाच पाहून आहें. तथापि तुझ्याच मनांत जर त्याला इकडे आणावयाचें असेल तर आतां लवकर जा. ( अंमळ विचार करून ) पत्रलेखे, महाश्वेतेकडे गेलं असतां त्या कुमाराचा सर्व वृत्तांत कळणार आहे, तर चल आपण तिकडेच जाऊं ( असें ह्मणून हळूच उठते ) पत्रलेखे—

पद. ( पिलु—दीपचंदी. )

मूढा हृदया किती समजाऊं ॥
विरहव्यथा ही कैशी साहूं ॥ ध्रु० ॥
प्रियकर दर्शन प्रेमें घ्याया ॥
जाउनि तेथें सौख्य जिवा या ॥
काय करूं मी न सुचे कांहीं ॥ १ ॥

( असें ह्मणून दोघी निघून जातात. )

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ— नगराबाहेरील प्रदेश.

( तदनंतर चंद्रापीड चिंतातुर होऊन आपल्याशींच विचार करीत प्रवेश करितो. )

चंद्रा०—( दुःखानें श्वास टाकून. )

पद. ( मनतिहु तेरे हिजम )

स्मर देई भारी ताप हा देहास नावरे ॥
विरहानळें बहु पोळते ही हाय! तनु झुरे॥
धृ० ॥ लज्जावती ती सुंदरी हृदया हरी
खरे ॥ मनमोहिनी प्रिय कामिनी ती काय
करी बरें ॥ १ ॥

( इकडे तिकडे फिरून व विचार करून ) मी तर उज्जयिनीस सुखरुप येऊन पोंहोंचलों; परंतु माझा सखा वैशंपायन जवळ नसल्यामुळें मला कांहींच सुचत नाहीं. त्याच्या विरहानें त्याच्या मातापित्यास अनिवार दुःख होत आहे. मी हेमकूटावर गेलों त्यावेळेपासून त्याजबद्दल कांहीं समाचार कळत नाहीं, तो कुठें असेल! काय करीत असेल! अच्छोद सरोवरीं तो होता ह्मणून कळतें; परंतु आतां तो त्याच ठिकाणीं असेल कां? त्याचा शोध लावून परत येऊन येण्या-

विषयीं तर मला तातांझा झाली आहे; करितां अच्छोद सरोवरीं जाऊन त्याचा शोध केला पाहिजे. (पुढें जाऊन व विचार करून.) तिकडे ती कादंबरी काय करीत असेल ! पत्रलेखा गेल्यालाही बरेच दिवस झाले. ती माझ्या येण्याची अगदीं वाट पहात असेल. ( इकडे तिकडे पाहून ) हाच अच्छोद सरोवराचा मार्ग ! ह्या रम्य जलाशयाच्या ठिकाणीं मन रममाण होऊन तर तो राहिला नसेल ना ? माझ्या प्रियसख्या वैशंपायनाचें निवासस्थान कुठें असेल ! तो काय करीत असेल ! ! ( पडद्यांत ) अहो वैशंपायनाचें निवासस्थान आतां कोठून असणार ? ( ऐकून व चपापून ) काय ह्मणतां ? वैशंपायनच नाहीं ? हायहाय ! ! ! आतां काय करूं ? ( असें ह्मणून जमिनीवर पडतो )

मेघ०—( घाईनें पुढें होऊन ) हां हां महाराज, हें काय ? सावध व्हा ! ( असें ह्मणून वारा घालून सावध करितो )

चंद्रा०—( अंमळ सावध होऊन श्वास टाकून व डोळे उघडून ) मेघनादा, अगोदर माझ्या वैशंपायनाविषयीं विचारतों तें सांग. माझा सखा वैशंपायन अच्छोद सरोवराजवळ तुला भेटला काय ? मला टाकून राहिला त्याचा त्याला कांहीं पश्चात्ताप वाटतो आहे काय ? तो तेथेंच आहे किंवा दुसरे स्थलीं गेला ?

मेघ०—( हात जोडून ) महाराज, आपण ' मी वैशंपायनाला भेटून तुझ्या पाठोपाठ अश्वासह आलोंच पहा ' असें मला सांगून निरोप दिला. नंतर अच्छोद

सरोवरीं वैशंपायन पुनः केव्हां गेला हें मला कांहींच माहित नाहीं. महाराज! ह्मटल्याप्रमाणें लवकर आले नाहींत व आतां ह्या पावसाच्या दिवसांत महाराजांनीं कितीही यत्न केले तरी, महाराज तारापीड, देवी विलासवती व आर्य शुकनास हीं आपल्याला कधींही जाऊं देणार नाहींत असें आह्मांस वाटलें ह्मणून 'तूं आतां पुढें कशाला येतोस? आह्मीं पोहोंचल्यासारखींच आहों, तूं परत जा' असें अच्छोद सरोवराच्या अलीकडे सुमारें तीन चार टप्पे पत्रलेखेनें मला सांगितलें, ह्मणून मी परत आलों.

चंद्रा०— माझ्या येण्याचें वर्तमान ह्यानें पत्रलेखेच्या द्वारें ऐकून अगोदरच कोठें पलायन केलें नसेल ना? हाययहाय!! वैशंपायन येथें कोठें सांपडत नाहीं, ह्यामुळें माझे पाय सुद्धां आतां पुढें जाण्याला हालत नाहींत. कामबाणांनीं पीडीत झालेले माझे प्राण तर जाऊं पहातात. आतां काय करूं? वैशंपायनाचा वृत्तांत कदाचित महाश्वेतेला ठाऊक असेल तर तिला तरी जाऊन विचारावा. (पुढें पाहून) हाच तो महाश्वेतेचा आश्रम, व ही पहा महाश्वेता स्वस्थ बसली आहे. तर तिच्या जवळ जाऊन सर्व वृत्तांत तिला विचारावा.

(असें ह्मणून पुढें जातो.)

(तदनंतर शिलातलावर खालीं मुख करून बसलेली, व मोठ्या यत्नानें तरलिकेनें सांवरून धरलेली, दुःखानें पीडित अशा महाश्वेता प्रवेश करिते.)

महा०--( दुःखाचा श्वास टाकून )

पद. ( ऐ मेहेर बेवफा० )

जाईना प्राण हा कशाला ताप सखे हा फार । छळी मनाशीं विकार ॥ धृ० ॥ अहा ! कशी महा अभागी निष्ठुर ही मी फार ॥ नसे कुणाचा आधार ॥ १ ॥ कसें करूं सखे मनाला प्रेम वरी अनिवार ॥ नसे तदां सुविचार ॥ २ ॥ सदैव ही छळी जनाला विरह व्यथेनें फार ॥ मनीं झुरे अनिवार ॥ ३ ॥

चंद्रा०--( आपल्याशीं आश्चर्यानें ) काय आश्चर्य ! माझ्या येण्यानें हिला फार आनंद व्हावयाचा, तो ह्या वेळीं कांहींच दिसत नाहीं, ( तरलिकेस ) तरलिके, हा काय प्रकार आहे ?

महा०--( चंद्रापीडाकडे पाहून व अश्रु टाकून दुःखानें ) महाभागा, ह्या नीच स्त्रीनें तुला काय सांगावं ? तूं सर्वदां सुखाच्या गोष्टी ऐकाव्या असं असून ज्या कठिण हृदयेनं तुला पूर्वी एकदां आपलं दुःख ऐकविलं तीच ही मी मंदभाग्या, निर्लज्ज, निष्ठुर तुजकडून दुसरं दुःख ऐकवीत आहे.

चंद्रा०--( आश्चर्यानें ) भगवती, असें कोणतें दुःखदायक वर्तमान ऐकण्याचें माझें नशीबीं आलें आहे ?

महा०—केयूरकानं तूं स्वगृहीं गेल्याचं वर्तमान कळविलं, तत्क्षणीं मीं खिन्नमानस होऊन, ह्या अभागीच्या योगानं कोणालाही सुख होत नाहीं तर ही दुर्दैवी जन्मास तरी कशाला आली, असं वाटून मला अधिकच वैराग्य प्राप्त झालं व कादंबरीचा स्नेहपाश तेंव्हांच तोडून पुनः तपश्चरणार्थ मीं या ठिकाणीं आलें.

चंद्रा०—बरं मग ?

महा०—इथं आल्यावर, वयानं व आकृतीनं थेट महाभागा सारखा, ज्याचं अंतःकरण थाऱ्यावर नाहीं, जो चंचल दृष्टीनं हरवलेली कांहीं वस्तु शोधीत आहे, असा येथें आलेला तरुण ब्राह्मणपुत्र मीं पाहिला.

चंद्रा०—बरें पुढें ?

महा०—तो मजजवळ येऊन एकसारखा टक लावून पाहूं लागला; त्याला मीं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें, तरी तो ओळखीचासा दिसे ! तो कामपीडेनं अगदीं सुकून गेला होता.

चंद्रा०—नंतर पुढें काय झालें ?

महा०—मी जरी या जगांत सर्व प्रकारें निराश झालें होतें, तरी त्याला पाहून मला फार भीति उत्पन्न झाली व मजवर हें मोठं संकट ओढवलं असं वाटलं; आणि जर ह्या कामोन्मत्तानं मला पापिणीला कदाचित स्पर्श केला, तर मीं खचीतच प्राण देईन ! आणि असं झालं ह्मणजे मग आजपर्यंत प्रिय पुंडरीकाच्या पुनर्दर्शनाची आशा धरून मीं जें कांहीं दुःख भोगिलं तें व्यर्थ

पाण्यांत गेलेसं होणार! ह्या प्रमाणं मी चिंतन करीत असतां तो धटिंगण मजजवळ येऊन मदनचेष्टा करून बलात्कार करूं लागणार, तों माझ्या मस्तकांतून एकदम क्रोधाग्नी निघाला व डोळ्यांतून बाष्परूपी त्याच्या ठिणग्या चमकूं लागल्या!!

**चंद्रा०**–(दुःखानें) त्याच्या पापाचीं पूर्ण शंभर वर्षें भरलीं, त्या प्रमाणें त्याला इच्छा झाली. असो मग?

**महा०**–त्या आवेशांत कांहीं विचार न करितां वर चंद्रमाकडे पाहून हात जोडून मीं ह्मटलं, भगवान्, हे सकलभुवनशिरोमणे, जर मी प्रिय पुंडरीकाचं दर्शन झाल्यापासून स्वप्नांतही परपुरुष इच्छिला नसेल, तर माझ्या ह्या सत्यवचनानं हा मेला कामातुर शुक जातींत पडो!

**चंद्रा०**–हरहर! काय तरी हा भयंकर परिणाम! मग पुढं?

**महा०**–असं बोलतांच मुळाशीं तरू तोडला असतां तो जसा धाडकन भूमीवर पडतो त्या प्रमाणं तो अचेतन होऊन पडला! (श्वास टाकून महाश्वेता निचेष्ट पडते)

**चंद्रा०**–(घाबरून बाईनें) हायहाय! हें काय! हिच्यावर असा हा एकाएकीं काय प्रसंग आला! (वारा घालून) भगवती, हे गंधर्वराजकन्ये, महाश्वेते, सावध हो सावध हो!! (तरलिकेस) तरलिके, ह्या ठिकाणीं मी पर्णशय्या करून देतों, ह्यावर हिला स्वस्थ पडूं दे. तूं जवळच बैस. मी पाणी आणून हिला सावध करितों. (असें ह्मणून जातो.)

( इतक्यांत कादंबरी पत्रलेखेचा हात धरून व मदलेखेशीं बोलत प्रवेश करिते. )

कादं०—

पद. (कंथबिन रही अकेली० )

प्राण हरी स्मरबाण जाण मम ॥ धृ० ॥
विरहव्यथेनें पीडा होई निर्दय तो रिपु मदन ॥ जाण मम० ॥ प्राणविसावा या हृदयाचा । प्रीय नसे सुखधाम ॥ २ ॥
काय करूं हा ताप मनाचा । काय हरी करी काम ॥ ३ ॥

मदलेखे, ही पत्रलेखा दररोज सांगते खरी पण मला असं मुळींच नाहीं वाटत, कीं तो अति निष्ठुर, शठ, निर्दय, पुनः इकडे येईल ! माझी हिमगृहांतील ती अवस्था खोटी मानणारा दुष्टबुद्धी त्या वेळेस येथें काय वक्र भाषण बोलला, मग तूंही त्याच्याकडे पाहून त्यावर हंसून हंसून लागेलसं स्पष्ट काय उत्तर केलंस, तें तुला स्मरत नाहीं काय? मीं मेलें, तरी कांहीं त्याला खरं वाटणार नाहीं ! अग माझ्या करितां एवढं दुःख सोशीत आहे, असं जर त्याला खरोखरच वाटतं, तर तो मुळीं येथून गेलाच नसता !

पत्र०—कादंबरी, मी तुला खरंच सांगतें कीं, तो चंद्रापीड इकडे आल्याशिवाय कधींही राहणार नाहीं.

कादं०—तो जरी पुनः आला तरी मी कांहीं त्याच्याशीं एक चकार शब्द सुद्धां बोलणार नाहीं. तूंच कायतें बोल.

पत्र०—कादंबरी, महाश्वेता सर्व प्रकारं तुझें प्रिय करील.

कादं०—चल तर तिकडे जाऊं ( जातात. इतक्यांत चंद्रापीड पाणी आणून महाश्वेतेच्या डोळ्यांस लावून तिला सावध करितो. )

महा०—( अमळ सावध होऊन व दीर्घ श्वास टाकून ) हे महाभागा ! काय सांगूं ! तो गतप्राण झाल्यावर त्याच्या सेवकजनांनीं आकांत मांडला, तेव्हां मग मला समजलें कीं, हा महाभागाचा परममित्र होता ( असें ह्मणून महाश्वेता स्तब्ध होते. )

चंद्रा०—( दुःखाचा श्वास टाकून, ) हाय हाय ! ! सख्या वैशंपायना तुजवर काय हें संकट आलें !

पद. ( बेहकिवा ते नकरा० )

सखया त्याग करोनी मज कोठें जाशी ॥
विरहें कष्ट महा होति अति देहाशी ॥ धृ० ॥
हृदयिं शांति नसे भ्रांतमना सुख नाहीं ॥
त्यजुनि घोर वनीं गुप्त असा कां होशी ॥ १ ॥
प्रिय तूं नित्य मला तुच्छ दिसे जग सारें ॥
सखया निष्ठुरता व्यर्थ मनीं तूं धरिशी ॥ २ ॥

---

सख्या वैशंपायना, हें तूं काय केलेंस! त्या तुझ्या मनोरमेला व शुकनासाला आतां काय सांगूं! तुझा माझा अत्यंत स्नेह असून आज मला न भेटतां आत्मघात करून घेतलासना! वैशंपायना! हा सख्या, आतां मी काय करूं?

**पद.** (जोगी, धुमाळ—जाते कीं मम शकुंतला०)

**दैवगती ही विपरित होतां संकट येत महा॥ प्रियकर माझा सागुनि गेला साहुं कसा विरहा॥ धृ०॥ बांधव सारे इष्टजनादिक होती कष्टि महा॥ श्रेष्ठ तुझी ती जननी आतां सागिल प्राण अहा!॥१॥ काय करूं मी या विरहानें दूषण देती पहा॥ दावुं कसें हें वदन जनाला सांगूं काय तया॥२॥ तुजसाठीं मी राज्य धनादिक सोडुनि घोरवना॥ आलों परि तूं जाशी आतां प्राण नको मज हा॥३॥**

(असें ह्मणून चंद्रापीड मूर्च्छित होतो.)

**तर०**—(घाईनें येऊन चंद्रापीडास सांवरून धरून महाश्वेतेस) बाईसाहेब, पुरे आतां लज्जा! हा पहा काय इकडे अनर्थ ओढवला आहे तो!

**महा०**—(पाहून व घाबरून घाईनें) तरलिके, ह्मणतेस काय लवकर पाणी आण!

तर०–( डोळ्यास पाणी लावते व डोळे पुसून महाश्वेतेस ) बाईसाहेब पहातां काय! ह्यांची मान मोडली! मस्तक रहात नाहीं! किती हालविलं तरीही शुद्धीवर येत नाहीं! डोळे उघडत नाहींत!

महा०–( पाहून व डोळ्यांत पाणी आणून मोठ्यानें श्वास टाकते ) हायहाय! हा श्वास सुद्धां आतां सोडीत नाहींसा झाला! हे भगवान् हा काय प्रसंग आणलास! ( चंद्रापीडाचे तोंडावरून हात फिरवून ) हे चंद्राकृते! चंद्रापीडा! कादंबरीप्रिया! बा तिच्याशिवाय कोठेंरे चाललास?

( इतक्यांत कादंबरी, मदलेखा, व पत्रलेखा प्रवेश करितात )

कादं०–( घाबऱ्यानें पुढें येऊन व पाहून ) हाय! हाय! काय हें!

गज्जल. ( आफसोसके )

**सखया नको जाऊं प्रियाही वनीं राही ॥ विरहानलें मी पोळतें न रुचे मला काहीं ॥ धृ० ॥ मम प्राण तूं असुनी असे मन रुष्ट कां केलें ॥ सजुनी अशी अबला प्रिया कां असें रुचलें ॥**

सखे मदलेखे, आतां मी काय गं करूं? त्या माझ्या प्राणप्रियावांचून मी आपला प्राण तरी कसा धारण करूं.

अंजनी गीत.

प्राणविसावा त्यागुनि जातां ॥
विरहव्यथाही हरिते जिविता ॥
काय करूं गे सखये आतां ॥
धीर नसे देहीं ॥ १ ॥

मद०— प्रियसखे, हा अंतस्थ शोकाचा वेग आता आटोप, अश्रुपूर पुरे कर, नाहीं तर तळ्यांत पाणी अतिशय तुंबलं म्हणजे तें जसं तीर फोडतं, त्या प्रमाणं तुझं हें हृदय फुटून जाईल. देवी मदिरा व महाराज चित्ररथ यांच्याकडे लक्ष्य दे; त्यांना तुजवांचून पुढं दुसरं कोण बरं आहे ? तूंच सांग !

कादं०—अग वेडे ! हें वज्रासारखं माझं कठिण जळलं हृदय कधीं तरी फुटेल काय ? जर फुटावयाचं असतं, तर असं झालं असूनही अजून फुटल्यावांचून राहतं काय ? अग; माता, पिता, बंधु, परिजन हीं सर्व कुणाला ? जिवंत असेल तिलाना ? मी तर मेलेलीच आहे ! माझं केवळ जीवितच असं! हें प्रियतमाचं शरीर मोठ्या आयासानं मला प्राप्त झालं आहे ! हें जिवंत असतं, तर ह्याच्या बरोबर मी संभोगसुख भोगिलं असतं. आतां हें मृत आहे, तर ह्याच्या बरोबर मीं सहगमनाचं सुख भोगीन, कोणीकडून तरी ह्या दोन गोष्टी माझं दुःख नाहींसं करणाऱ्या होत. प्रियसखी,

ह्या माझ्या प्रियतमानं मजसाठीं येथें येऊन आपला प्राणत्याग केला! केवढा हा त्याचा मोठेपणा! आणखी ह्यानं मजसाठीं काय करावयाचं? मीं मात्र व्यर्थ अश्रु टाकून मनाचा हलकटपणा दाखवीत आहें. हा स्वर्गाला जावयाला निघाला असतां, मीं उगीच अमंगल कां रडावं? पायांच्या धुळीप्रमाणं, मला ह्या प्रियाबरोबर जावयाला मिळत असतां रडणं हें मूर्खपण नव्हे काय? सखे काय सांगूं? आतां माझीं सर्व दुःखं लयास गेलीं! ज्याच्याकरितां मी कुलाचार गणला नाहीं, गुरुजनांची भीड धरली नाहीं, धर्म सुद्धां पाहिला नाहीं, माझी प्रियसखी महाश्वेता दुःखी ह्मणून मीं जी प्रतिज्ञा केली, तीही अन्यथा केली! त्या माझ्या प्राणेश्वरानं माझ्या करितां आपले प्राण सोडिले असतां, मीं हे असेच धारण करावे काय? मदलेखे! मग तूं असं कां बरं बोललीस? प्रियसखे—

पद. ( मज बहुतचि ही आशा० )

मत्प्रियकर हा त्यागुनि सखये जाई ॥ संगमसुख आशा नाहीं ॥ प्रियदर्शनही दुर्लभ मजला होई ॥ दैवयोग विपरित पाही ॥ चाल ॥ जीवित हें धरणें नलगे। कांताविण जगणें मागें। दुःखद हें सखये मजगे। वद काय करूं सुख तें कैसें होई ॥ मज नलगे जीवित बाई ॥ १ ॥

( डोळ्यांतून पडणारे अश्रु पुसून ) मदलेखे, तूं जर मजवर अत्यंत स्नेह करीत आहेस, आणि माझें हित साधीत आहेस, तर प्रियसखी, तूं एवढं मात्र कर कीं–

पद. ( धनाश्री धुमाळी. दुःशासन बाळक मांझे )

प्रियमाता जिवलग जनिता मजवांचुनि
कष्टी होती ॥ शोकाकुल ममविरहानें प्रा-
ण परित्याग करीती ॥ शांतवुनी उपदे-
शानें सुख देई त्यांचे चित्तीं ॥ चाल ॥
मत्सम तूं त्यांना पाही । परलोकीं जातें
बाई । तूं जलांजली त्यां देई । सखिजन-
सह प्रेमें राही ॥ १ ॥

मद०–( दुःखानें, कादंबरीचे डोळे पुसून ) सखे कादंबरी, आतां शोक पुरे कर. त्या तुझ्या महाश्वेते कडे तरी पहा ! तूं आपल्या मनाचं शांतवन कर. तुझ्यावांचून तो क्रिडापर्वत शुन्य होणार आहे.

काद०–( दुःखानें ) अग वेडे, आतां मला त्या क्रीडापर्वताशीं किंवा विलासमंदिराशीं काय कर्तव्य आहे ? माझा प्राणेश्वर जिकडे गेला तिकडे मीं जाणार ! आतां जगून तरी काय उपयोग ? शेवटीं तुला इतकंच सांगणं आहे कीं–

पद. ( भैरवी–दादरा )

प्रिय मैना मम कालिंदी ती ॥ शुक परि-
हास हीं दुःखी होती ॥ ध्रु० ॥ हरिण
शिशूतें सोडुनि देई ॥ हंस, नकुलिका,
वनजोत्स्ना हीं ॥ रक्षण करणें तुजवर
राही ॥ दैवगतीनें त्यागुनि जाती ॥ १ ॥

तसेंच मी वाढविलेल्या माधविलतेचीं पुष्पं फक्त देवांसच अर्पण करीत जा. माझ्या आवडत्या क्रीडापर्वतावरील वस्तूंचें यथायोग्य तूंच संरक्षण कर. आतां प्रज्वलित ज्वालांनीं सुंदर अशा अग्नींत माझ्या प्रियाला कंठालिंगन देऊन अप्रतिम सुख भोगितें. ( असें ह्मणून चंद्रापीडाला उचलून आपल्या अंकावर घेते व डोळ्यांत पाणी आणून )

पद. ( नृप ममता रामावरती० )

हा सखया त्यागुनि जातां । विरहव्यथा
दुःसह चित्ता ॥ कसें करूं ॥ निष्ठुरता
कांहो वरिता ॥ नच कोणी मजला त्राता ।
कसें करूं ॥ प्रिय, बंधु, आप्तगण, जनिता ॥
प्रिय नाहीं जगतीं आतां ॥ कसें करूं ॥
चाल॥लावुनी प्रेम या मनीं। त्यागणें जनीं,
असें कां करितां । आलिंगन–सुख दे
चित्ता ॥ १ ॥

( कादंबरीचा स्पर्श होतांच चंद्राप्रमाणें शुभ्र तेज एकाएकीं बाहेर निघतें. नंतर आकाशवाणी होते ) " वत्से महाश्वेते, मी पुनः तुला आश्वासन देतों कीं, तुझ्या पुंडरीकाचें शरीर माझ्या लोकीं माझ्या तेजानें पुष्ट व अविनाशी होत्सातें तुझ्या समागमार्थच मी ठेविलें आहे. हें दुसरें माझें तेजोमय स्वतःच अविनाशी, व विशेषतः कादंबरीच्या करस्पर्शानें पुष्ट होणारें चंद्रापीडाचें शरीर, शापदोषानें जरी मुक्त झालें आहे, तरी आत्मा ज्यांनीं ब्रह्मांडीं नेला आहे, अशा योग्यांच्या शरीराप्रमाणें हें शरीर तुह्मीं निराश न व्हावें ह्मणून तुमच्या विश्वासार्थ तुह्मांजवळ असूं द्या. ह्याला अग्निसंस्कार करूं नका. उदकांत किंवा दुसऱ्या कोणत्याही स्थळीं टाकूं नका, किंवा सोडून जाऊं नका. समागमप्राप्ति लवकरच होणार आहे, करितां हें चांगलें जपून ठेवा. " ( सर्वजण चकीत होऊन आकाशाकडे पहातात. )

पत्र०–( सावध झाल्यासारखें करून व वेड्यासारखी धांवत जाऊन जवळ असलेल्या इंद्रायुधाकडे पाहून ) इंद्रायुधा, आमच्या सारख्यांची गोष्ट राहूंदे; पण महाराजांनीं तुझ्या वांचून एकट्यांनींच दूर गमन केलें, त्यामुळें त्यांच्याशिवाय क्षणभरही आतां तूं इथें शोभणार नाहींस. ( असें ह्मणून इंद्रायुधासहवर्तमान पत्रलेखा अच्छोद सरोवरांत उडी टाकते. इतक्यांत त्यांतून एक तापसकुमार बाहेर प्रवेश करितो. )

ताप०—( महाश्वेते जवळ जाऊन व सद्गदीत होऊन, )

दिंडी.

राजकन्ये तूं धन्य जगीं होशी ॥
प्रियासाठीं हा देह कष्टवीशी ॥
कोण मी हा कोठील जाणशी कीं ॥
काय कारण जाणुनी येत लोकीं ॥ १ ॥

महा०—( घाईनें वर पाहून व नमस्कार करून, ) भगवन् कपिंजल, तुला देखील ओळखणार नाहीं, इतकी का मी पापिणि आहे! कपिंजला, अगोदर ज्यानं माझ्या प्रियाला वर उचलून नेलं तो कोण ? त्यानं त्याला कशाकरितां नेलं ? पुढं त्याचं काय झालं ? आजपर्यंत तूं कुठं होतास, माझ्या प्रियाशिवाय इथं एकटाच कसा आलास ? हें सर्व मला आधीं सांग !

कपिं०—गंधर्वराजकन्ये, सांगतों ऐक—तूं शोकाकुल असतां तुला एकटीला टाकून मी माझ्या मित्राच्या मागून गेलों हें तुला ठाऊकच आहे. मी त्याला विचारीत असतां कांहींएक उत्तर न देतां एकसारखा आकाशमार्गानें जातजात चंद्रलोकाप्रत तो गेला. तेथें पुंडरीकाचें प्रेत मंचकावर ठेवून तो ह्मणाला—कपिंजला, चंद्रमा ह्मणतात तो मीच. मी नेहमीं प्रमाणें जगावर अनुग्रह करण्याकरितां गेलों असतां, तुझ्या ह्या प्रिय मित्रानें कामपीडेनें संतप्त होऊन आपल्या अपराधा-

बद्दल मला व्यर्थ शाप दिला कीं, "हे दुरात्म्या घातक्या चंद्रा! मी कामातुर होऊन प्रेमानें बद्ध झालों असतां, ज्या प्रमाणें तूं मला आपल्या किरणांनीं ताप देऊन प्राणहरण केलेंस, त्या प्रमाणेंच ह्या कर्मभूमिभूत भारतवर्षामध्यें तूंही मजसारखा कामातुर होऊन अत्यंत प्रीतीनें बद्ध होऊन तीव्र असह्य हृदयवेदना भोगीत असतां मरण पावशील."

महा०—कपिंजला, ह्या शापामुळं त्या बिचाऱ्या चंद्रालाही दुःख भोगावं लागल ना? बरं मग काय झालं?

कपिं०—नंतर चंद्रानेंही माझ्या मित्राला उलट शाप दिला कीं, "तूंही मजसारखाच दुःख भोगशील."

महा०—हरहर! परस्परांच्या शापामुळं अशीं जन्मोजन्मीं दुःखं भोगावीं लागलीं ना! मग पुढं?

कपिं०—"तेव्हां ह्या शापापासून मुक्त होईपर्यंत आत्मारहित शरीराचा नाश होऊंनये ह्मणून हें मीं वर उचलून आणलें व वत्सा महाश्वेतेलाही आश्वासन दिलें आहे" असें सांगून मला हें वर्तमान श्वेतकेतूला कळविण्याकरितां जाण्यास सांगितलें.

महा०—बरं मग?

कपिं०—त्याच्या आज्ञाप्रमाणें मी हें वर्तमान श्वेतकेतूला सांगण्याकरितां धांवत जात असतां अत्यंत कोपाविष्ट अशा एका विमानस्थ देवाचें म्यां नकळत उल्लंघन केलें. त्यानें तत्क्षणीं मला शाप दिला कीं, "तूं मिथ्या तपोबलानें मदांध होऊन घोड्यासारखें उद्दाम

चालून माझें उल्लंघन केलें आहेस, तर तूं जा आणि मनुष्यलोकीं घोडा हो."

महा०—कपिंजला, तुला देखील शापामुळं दुःखं भोगावीं लागलींना? दैवगति विचित्र खरी! बरं मग?

कपिं०—नंतर मी शरण जाऊन त्यास विनंती केली कीं, मी मित्राच्या शोकानें अंध झाल्यामुळें हा मजकडून प्रमाद घडला. मी बुद्ध्या केला नाहीं, तर मजवर प्रसाद करावा. ह्यावर तो बोलला कीं, जें मी बोललों तें कधींही फिरणार नाहीं; परंतु इतकेंच सांगतों कीं, तूं ज्याचें वाहन होशील, तो मृत्यु पावतांच तूं स्नान केलेंस ह्मणजे शापापासून मुक्त होशील. नंतर मी बोललों कीं, महाराज माझ्या प्रिय पुंडरीकाचें चंद्रमासह मनुष्यलोकीं शापामुळें जन्म होणार आहे, तर मी अश्व असतांही मला दिव्य चक्षूनें त्यांचें दर्शन होऊन कधींही वियोग न होईल असें करा.

महा०—हरहर! तुह्मा उभयतांची अशी अवस्था झाली काय?

कपिं०—नंतर तो कांहीं वेळानें मला ह्मणाला कीं, "उज्जयिनीचा तारापीड नांवाचा राजा अपत्यासाठीं फारच देवधर्म, व्रतानुष्ठानादिक करीत आहे, त्याचा पुत्र चंद्रमा होणार आहे. तुझा मित्र पुंडरीक हा त्याचा प्रधान जो शुकनास, त्याचा पुत्र व्हावयाचा आहे. तर तूं ही त्या परोपकारी चंद्रावतार राजपुत्राचें वाहन हो." हें त्याचें बोलणें कानीं पडतांच मी तेथून खालीं समुद्रांत पडलों, व अश्व होऊन उभा राहिलों. त्या

जातींत असतांही मला ज्ञान होतें; आणि हाच हेतू साधण्या करितां मीं चंद्रापीडाला घोडतोंड्याच्या पाठीमागें लावून येथें आणिलें. पूर्वजन्मींच्या प्रीतीमुळें तुझा अभिलाष करीत असतां, तूं न जाणतां त्याला शापाग्नीनें दग्ध केलेंस, तोच वैशंपायन माझा प्रियमित्र, पुंडरीकाचा अवतार होता !

महा०–( दुःखानें श्वास टाकून ) हा प्रिया पुंडरीका ! ! तूं जन्मांतरींही मजवरची प्रीति विसरला नाहींस ! हाय हाय ! !

गज्जल. ( इंदिनो जोष् )

पुंडरीका प्रिया कां सजोनी देसी ॥
साहुं कैशी दुःख भोगा अहाहा! प्रिया
जाशी ॥ ध्रु० ॥ रुष्ट मन कां हा दयाळा
कां उपेक्षा केली ॥ नाथा ही दीन अबला
कशाला मनें वरिली ॥ हा दैवा ! हा वि-
धात्या व्यर्थ जन्मा आणिलें ॥ हा नाथा !
पापिणीनें तुह्मांसी कसें हरिलें ॥ १ ॥

हे माझ्या मुखाकडे पहाणाऱ्या, सर्व जगत् तुला मन्मय दिसत होतेंना ? तुला लोकांतरीं पाठवायला व तुझा सर्व प्रकारें पुनः पुनः नाश करण्याकरितां मल्या ब्रह्मदेवानें ह्या राक्षसीला उत्पन्न करून हें जळं ए-

वढं आयुष्य दिलं आहे! हाय! हाय! मी पापिणीनं तुला ठार मारिलं! आतां मी काय करूं? हा पुंडरीका मजजवळ एक शब्द तरी बोल!

पद. ( हालेय सुमन परी )

हाय! हाय! हा प्रिया! कसें करूं जगीं
प्रिया ॥ सजोनि एकली प्रिया । अनाथ
ही न कां दया ॥ धृ० ॥ न जाणतां असें
घडे । असह्य शोक हा जडे । प्रिया वनीं
अहा! पडे । सजूं नका प्रिया नया ॥१॥
प्रसंग घोर हा असा । प्रिया तुह्मांवरी
कसा ॥ कोपशी प्रभो कसा । नको
जिवास ताप या ॥ २ ॥

हा प्राणविसाव्या पुंडरीका, आतां मी काय करूं? ह्या प्रसंगीं मी शरण तरी कुणाला जाऊं? मजवर दया तरी कोण करील? प्रिया पुंडरीका! तुजवांचून मला जगांत कोणी नाहीं.

पद. ( भैरवी–दादरा. )

हा सखया मी काय करावें ॥ कोणासंगें
दिन कंठावे ॥ धृ०॥ पुनरपि दर्शन होईल
ह्मणुनी ॥ दिवस कंठिले आशा धरुनी ॥

दुष्ट विधी हा छळितो अजुनी ॥ व्यर्थ
जगांनी दुःखित व्हावें ॥ १ ॥

(श्वास टाकून) पुंडरीका, मी इतकी बडबड करीत असूनही तूं कांहींच बोलत नाहींस, ह्यावरून खचितच ह्या मंदभाग्येवरचं प्रेम तूं टाकलंस असं वाटतं. हाय हाय !! (मूर्च्छित पडते.)

**कपि०**–(करुणा येऊन) गंधर्वराजतनये, तूं कां उगाच शोक करीत आहेस? आजपर्यंत त्याच्या समागमाच्या आशेनें हृदय घट्ट करून सर्व दुःख जसें तूं निमुटपणें सोसलेंस, तसेंच आतां अल्प काळ पर्यंत समागमाचे आशेनें कांहीं सोसून रहा. चंद्रमाचीही वाणी तुह्मीं ऐकिलीच आहे. उभयतांनाही अश्रेयस्कर जो शोक तो सोडून दे. माझ्या प्रियाला व तुला योग्य जें तपश्चरण तें तर तूं चालविलेंच आहेस. तप यथार्थ झालें असतां कांहींच असाध्य नाहीं. तूंही तपसामर्थ्यानें लौकरच पार्वती जशी शंकराच्या तशी माझ्या प्रिय मित्राच्या अंकावर बसशील.

**कादं०**–(डोळे पुसून व दीन वदनानें) भगवन्, आपण व पत्रलेखा ह्यांनीं ह्या सरोवरांत एकदम प्रवेश केला, मग तिचं काय झालं?

**कपि०**–राजकन्ये! उदकांत गेल्यानंतरचें मला कांहींच वृत्त माहीत नाहीं. आतां चंद्रावतार जो चंद्रापीड व पुंडरीकावतार जो वैशंपायन, तसेंच पत्रलेखच

काय वर्तमान आहे हें सर्व कळण्याकारितां मी सर्वद्रष्टा जो पिता श्वेतकेतु ह्याच्या चरणाजवळ जातों. तुह्मी स्वस्थ रहा. ( असें ह्मणून आकाशमार्गे निघून जातो त्याजकडे पाहून सर्व आश्चर्य करितात. )

कादं०—( महाश्वतेच्या गळ्यास मिठी मारून दुःखानें )

पद. ( पिलू-धुमाळी—बलसागरतुह्मी० )

प्रियकर माझा त्यागुनि जातां सौख्य कसें
होई ॥ साहुं कसा गे शोक सखे मी काय
करूं बाई ॥ ध्रु० ॥ रक्षण करणें जीवित
आतां हितकर हें नाहीं ॥ मरण बरें कीं
या समयासी सांग सखे कांहीं ॥ १ ॥

प्रियसखे, आतां तुजवांचून मला उपदेश करणारं दुसरं कोण आहे? आतां मी पुढं काय करूं तें सांग. मी तर वेड्यासारखी झालें आहें.

महा०— गडे, आतां कसचं विचारणं आणि कसचा उपदेश ! अग प्रियाच्या समागमाची आशा ही कांहीं मोठी अनिवार्य आहे, ती तुजकडून जें करवील तें तूं निमूटपणें कर. सखे मला आकाशवाणीनं आश्वासन दिलं होतं. तुझी कांहीं तशी गोष्ट नाहीं, तुला विश्वासस्थान हें चंद्रापीडाचं शरीर तर तुझ्या अंकावर आहे ! असं असतां मग काय करावं, ही चिंता तुला कां? तशांत हें अविनाशी आहे. तर ह्याची

पूजा करावयाची सोडून दुसरं काय करणार ? न दिसणारीं जीं दैवतं त्यांच्या प्रतिमा भक्तीनं पूजिल्या असतांही इष्ट फळं देतात, मग ही चंद्रापीड नांवाची प्रत्यक्ष चंद्रमूर्ती आपण होऊन तुला प्रसन्न झाली असतां; ती तुझे मनोरथ पूर्ण करणार नाहीं, असं कधीं तरी संभवेल काय ?

कादं०—( डोळे पुसून व उठून ) बरं तर तुझ्या सांगण्याप्रमाणं करितें. तरलिके, चल तर ही रम्य मूर्ति निर्विघ्न ठिकाणीं घेऊन जाऊं. आतां व्यर्थ काळ घालविणं योग्य नाहीं. सखे मदलेखे, तूं जाऊन माझ्या मातापित्याला हा सर्व वृत्तांत सांग. नाहींतर तीं मलतंच कांहीं समजून मजविषयीं दुःख करून प्राणत्याग करतील ! मी शाप संपून प्रियाचं दर्शन झाल्याशिवाय येणार नाहीं ह्मणून सांग. त्यांना इकडे आणूं नको बरं ! त्यांचं शांतवन कर. ( आपल्याशीं ) शाप संपण्याचा काळही अगदीं जवळच आला आहे, तोंपर्यंत. व्यर्थ काळ न घालवितां ह्या चंद्रमूर्तीचे पूजनांतच मी शांतवन करून घेतें. ( असें ह्मणून जातात. )

( तदनंतर दुःखानें व्याप्त झालेली महाश्वेता तरलिकेचे खांद्यावर हात टाकून प्रवेश करिते. )

महा०—( दुःखाचा श्वास टाकून. )

पद. ( बिहाग—दादरा—कवणें तुज गांजियलें. )

प्राणसखा पाहिन का पुनरपी सखे ॥

दुष्टविधी घात करी सुख न होइगे ॥ धृ० ॥
विरहव्यथा साहुं कशी । मदन दुष्ट छळि
मजशीं ॥ दैवयोग भोग मशीं । विरह करी
त्रास निशीं ॥ काय करूं या समयीं कोण
तारिगे ॥ १ ॥

हा प्रिया पुंडरीका, आतां मी काय करूं ! या अ-बलेला सोडून तूं एकटाच कसा रे गेलास ? आतां या हतभागिणीनं कोणाकडे पाहून दिवस काढावे ? मजवरील प्रेम एकाएकीं कसं नाहींसं झालं ?

तर०—महाश्वेते, आतां शोक पुरे कर. आकाश-वाणीनं तुला आश्वासन दिलं आहे. त्या अर्थी तुह्मां उभयतांचा समागम झाल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. त्या तुझ्या कादंबरीकडे पहा ? तूंच शोकाधीन झाल्यावर तिचं तरी शांतवन कोण करणार ?

महा०—तरलिके, माझी प्रियसखी जी कादंबरी, ती सुखानं हेमकूट पर्वतावर राहिली असती; परंतु तिच्यावरही ह्या दुष्ट दैवानं घाला घातला, ह्यामुळं तर फार वाईट वाटतं. आपल्यामुळं दुसऱ्याला दुःखांत पा-डणारी ही अभागी जन्मास तरी कशाला आली !

तर०—महाश्वेते, भवितव्यतेपुढं उपाय काय ? आतां शोक आटोप आणि तिकडे कादंबरी फारच दुःख क-

रीत आहे तिचं शांतवन कर. तुझ्याशिवाय तिचं शांतवन तरी कोण करणार ?

महा०—बरं चल. ( दुःखानें डोके धुमून ) सखे कादंबरी, माझ्या संगतीनं तुलाही दुःख भोगावं लागलं-ना ? हर हर !!

( कादंबरी चंद्रापीडाचें शीर मांडीवर घेऊन बसली आहे व जवळ मदलेखा तिची समजूत करीत आहे. )

कादं०—( पाहून ) प्रियसखी, हें जं मला इतकं तेजस्वी शरीर दिसतं, तें काय माझी ह्यावर प्रीति आहे ह्मणून दिसतं, कीं हें अविनाशी आहे ह्मणून ? तूं तरी पहा बरं नीट निरखून.

मद०—ह्यांत पहावयाचं तें काय ? ह्या शरीरांत एक आत्मा मात्र नाहीं, ह्मणून ह्याचे सर्व व्यापार बंद झाले आहेत. बाकी तेज कांति जशीची तशीच आहे.

कादं०—( डोळ्यांत पाणी आणून, ) सखे मदलेखे, मी ह्या प्रियतमाला पुनः आनंदमुद्रेनं पाहीन काग ?

मद०—अग ह्याची तूं मुळींच काळजी करूं नको. तुझ्या इच्छे प्रमाणं लवकरच सर्व होईल.

कादं०—मदलेखे, जा लवकर; आणि तूं पूजासाहित्य तशीच सुगंधीत पुष्पमाला व सुगंधीत द्रव्यं घेऊन ये. माझा प्राणेश्वर आतां मला भेटेल असं मुळींच वाटत नाहीं. आतां व्यर्थ जगून तरी काय उपयोग ! जिकडे माझा प्राणेश्वर गेला तिकडेच मी जाणार ! हा दुःख

शोक माझ्याच्यानं सहन करवत नाहीं. ह्या माझ्या जीवितेश्वराच्या शरिराची पूजा करून हा मी आपला देह अग्नीस अर्पण करणार! ह्मणून तूं लवकर जाऊन चिता तयार कर. आतां विलंब लावूं नको.

**मद०**—कादंबरी तूं काय वेडी आहेस? आकाशवाणीनं तुला अश्वासन दिलं आहे, त्यावर विश्वास ठेव. चंद्रमूर्तीचे पूजनानंच तुझे मनोरथ पूर्ण होतील, हें महाश्वेतेचं वाक्य लक्ष्यांत धर.

**कादं०**—तूं किती जरी सांगितलेस तरी तें या प्रसंगीं व्यर्थ आहे. जा लवकर आणि सर्व सिद्धता कर.

**मद०**—( दुःखानें डोळे पुसीत जाते व पूजापात्र आणून ) कादंबरी हें घे साहित्य.

**कादं०**—( आपल्याशीं ) प्राणनाथ ही माझी शेवटची पूजा आपण ग्रहण करावी.

**पद.** ( धुमाळी—घोरभयंकर निर्जल० )

**बाष्पबिंदु उदकानें नाथा स्नान तुह्मां घातलें ॥**
**प्रेमदृष्टिनें सर्व शरीरा आनंदें झांकिलें ॥**
**प्रीतिरसानें युक्त शरीरा हरिचंदन चर्चिलें ॥**
**कोमल कुसुमें भूषण देहा प्रेमानें वाहिलें ॥१॥**

( दुःखानें श्वास टाकून ) हा प्रिया, चंद्रवदना चंद्रवत् शितलस्वभावा, आतां ह्या पुढं माझ्यानं कांहींच बोल-

वत नाहीं. प्राणप्रिया ह्या अबलेवरचं प्रेम एकाएकीं कांहो टाकलेंत! शाप संपण्याची आशा आकाशवाणीनें लाविली होती; परंतु तीही निराशाच झाली! हायहाय!!

पद. (कांते फार तुला मजसाठीं०)

नाथा सांगुनियां मज गेलां काय करूं
आतां ॥ विरहव्यथा ही जाळितसे कीं
निष्ठुरता अशि कां मनिं धरितां ॥धृ०॥
सर्व सुखाचे भक्त तुह्मीं हो सांगुं कुणातें
हितगुज आतां ॥ कांहिं नसे प्रिय या स-
मयासी हायहाय हा दुष्ट विधाता ॥ १ ॥
पुनरपि कांतां पाहिन कां मी प्राणविसावा
जो मज त्राता ॥ आलिंगनसुख देउनि प्रेमें
शांत करी हृदया प्रियनाथा ॥ २ ॥

(असें ह्मणून प्रेमानें चंद्रापीडास घट्ट आलिंगन देते. त्या बरोबर चंद्रापीड सजीव होतो.)

चंद्रा०—(सावध होऊन व प्रेमानें कादंबरीकडे पाहून घट्ट मिठी मारितो.)

पद. (व्हुवा तुरका०)

सखये प्रिये विमले सुशीले ॥ धृ० ॥

प्रियविरहें बहु शोक हा होई ।
हृदयिं सदां मनीं सुख तें न वाले ॥ १ ॥
विमलकरें तव प्राण या देहीं ।
सखये पहा कसे सविकार झाले ॥ २ ॥
मदनशरें बहु ताप या देहीं ।
अधरामृतें त्वरें सुखवि स्वलीलें ॥ ३ ॥

कादं०—( डोळे उघडून प्रेमानें )

पद. ( भैरवी–दादरा. )

हा प्रियनाथा भेटे मजला ॥
आलिंगनसुख दे हृदयाला ॥धृ०॥
विरहव्यथेनें पिडिलें देहा ॥
दैवबळें हें दुःख अहाहा ॥
ईशकृपेनें जाइ लयाला ॥ १ ॥

चंद्रा०—( आनंदानें जवळ घेऊन ) कादंबरी—

पद. ( प्रिये पहा रात्रीचा समय० )

प्रिये अहा! प्रेमानें संगमसुख दैवबळें भो-
गितसे ॥ धृ० ॥ शाप लया जात आज ॥
व्यर्थ नको हृदयिं लाज ॥ कोप भया काय
काज ॥ सुखद हें नसे ॥ १ ॥

( इतक्यांत पडद्यांतून "कोणि तरी प्राणसखा भेटवा कृपा करा" हें पद्य ह्मणत महाश्वेता प्रवेश करिते )

महा०—हा प्राणनाथा पुंडरीका! अजून देखील या हतभाग्येची दया येत नाहींना? हाय हाय! ( इतक्यांत ज्या रूपाला व वेषाला पाहून महाश्वेता उत्कंठित होती त्याच वेषानें कपिंजलाचा हात धरून पुंडरीक प्रवेश करितो. )

पुंडरीक—( आनंदानें कपिंजलाचा हात धरून )

पद. ( मजवरि हें आलें० )

विधि अनुकूल होतां संकट नाहीं ॥
प्रियकर मग सारे दुर्मिळ नाहीं ॥ धृ० ॥
पूर्ण सुखाचें धाम सखी ती ।
मजसाठीं जन दुःखी होती ।
हाहा! प्रिय बाले सुशीले ।
नयनानंदकले । प्राणसखा हा निष्ठुर
झाला । आलिंगनसुख मजला देई ॥१॥

( असें ह्मणून महाश्वेतेस भेटतो. )

महा०—( आलिंगन देऊन ) प्राणनाथ—

पद. ( भ्रम जो अनादि० )

सखया क्षमा करा या वेळीं ।

निर्दय मी ह्मणुनी सुख नाहीं ।
शाप ताप या देहीं ॥ धृ० ॥
कारण केवल दुर्दैवी ही ।
विरहव्यथा बहु होई॥सखया वि०॥१॥
शेवट परि हो गोड प्रिया हा ।
होत असे जें भाळीं ॥ सख० ॥ २ ॥

पुंड०—( चंद्रापीडास ) मित्रा चंद्रापीडा—

साकी. (धुमाळी.)

विजय असो चिरकाल सख्या तव कीर्ति
जगतीं होवो ॥ त्रिपुरारी तो श्रीगिरि-
जापति इच्छित मनिचें पुरवो ॥ लोकीं
प्रियकर हो । दुर्दिन सर्व लया जावो ॥१॥

( चंद्रापीड व पुंडरीक एकमेकांस भेटतात. )

चंद्रा०—मित्रा पुंडरीका, पूर्वजन्मीं जरी तूं माझा भामात होतास तरी ह्या जन्मीं मजबरोबर सुहृद् स्नेह-भावानें वागावें.

( इतक्यांत मदलेखा प्रवेश करिते. )

मद०—कादंबरी, देवी मदिरा व चित्ररथ ह्यांनीं आपणांस भेटण्याकरितां तिकडे बोलाविलें आहे, तर अगोदर चलावें.

चंद्रा०—कादंबरी, सर्व गोड झालें; परंतु आतां तिकडे उज्जयिनीस मला लवकर गेलें पाहिजे. तर चल आधीं देवी मदिरा व चित्ररथ ह्यांस भेटूं व नंतर तिकडे जाऊं. ( पुंडरीकास ) सख्या पुंडरीका, आतां आणखी प्रिय होण्याचें काय राहिलें आहे ?

पुंड०—चंद्रमूर्ते चंद्रापीडा, झालें तें सर्व ठीक झालें आतां—

पद. ( भैरवी—दादरा. )

मंगल हो सकलांतें ॥
परावलंबन दैन्य नको तें ॥ धृ० ॥
स्त्री विरहव्यथा कोणाहि नसो ।
युवयुवती जन हर्षे विलसो ।
इच्छित हेतू देइ जनातें ॥ १ ॥

चंद्रा०—ठीक आहे.

( असें ह्मणून सर्व जातात. )



# सडेकर यांचीं उपयुक्त पुस्तकें.

## सर्वसंग्रह.

या ग्रंथाचीं पृष्ठें ३०० असून विषयसंग्रह १८० वर आहे. आज ३ वर्षांमध्यें याच्या ३ आवृत्त्या निघाल्या, यावरून याच्या खपाचें व चांगुलपणाचें अनुमान करितां येईल. तरी अशा नित्योपयोगीं पडणाऱ्या व्यवहारिक ग्रंथाला प्रत्येक कुटुंबानें आपल्या विश्रांति करितां जवळ बाळगावें. किं० १ रुपया.

---

## अनंतरंग.

वाजिकरणादि औषधांसह पूर्ण शृंगार. किं० ८१२

---

## संगीत रासक्रीडा नाटक.

यांतील पद्यें सुरस असून ह्मणण्यास फार सोपीं आहेत, भाषाही उत्तम आहे. किं० ८८

---

## वैद्यकीसार संग्रह.

यांत निरनिराळ्या रोगांवर हटकून गुण देणारींच औषधें दिलीं आहेत. किंमत ८९

---

## पहिला प्रयत्न अथवा भाषांतर चंद्रिका.

नवीन इंग्रजी शिकूं इच्छिणारांस हें पुस्तक फारच उपयोगीं आहे. मास्तरचीसुद्धां गरज न लागेल, अशा प्रकारें इंग्रजीचें मराठींत आणि मराठीचें इंग्रजींत व्याकरणसहित भाषांतर केलें आहे. किंमत ८९

---

## मंगेशपदामृत.

श्रीशंकरावरील पदें, अभंग, आख्यान, स्तोत्रें, अष्टकें, भूपाळ्या, आरत्या, वगैरे पुष्कळ विषयांचा यांत समावेश केला असून किं० अवघी ८४

---

## कानडी मराठी पहिलें पुस्तक.

ज्यांना कानडी भाषेची माहिती करून घेणें असेल त्यांनीं हें पुस्तक जवळ बाळगावें. यांत कानडी मराठी वर्णमाला, अंक, जोडाक्षरें, बाराखड्या, एकाक्षरी द्व्याक्षरी इत्यादि ६ अक्षरी पर्यंत शब्दसंग्रह व धडे सुमारें १४ आहेत. किं० ८५

---

## ऋणविमोचन.

कर्जापासून कशा तऱ्हेनें मुक्त व्हावें, खर्च कसा केला असतां कर्ज होणार आहीं वगैरे बऱ्याच विषयांवर निबंध रूपानें. किं० ८२

## मित्रबोध.

लहान मुलांसच नव्हे तर थोरांससुद्धां बोधप्र असे १०४ वेंचीव चुटके. किं० ८२

---

## संगीत शृंगार रहस्य.

नवीन असून फारच टचकदार आहे. नावावरून आंतील विषयांची परिक्षा करावी किं० ८२

---

## अबलाज्ञानसुधा.

याच्या वाचना पासून आपल्या स्त्रियांचीं मुख्य कर्तव्य कर्में कोणतीं, त्यांनीं आपलें वर्तन कोणत्या प्रकारें ठेविलें असतां संसार सुखावह चालून त्यांत येणाऱ्या अडचणी दूर होतील, नवऱ्यावर स्त्रीची आणि स्त्रीवर नवऱ्याची खरी प्रीति जडण्याला काय उपाय, सुनेनें आपलें कर्तव्य कसें ठेविलें असतां तिला सुख होईल, मुली सुशिक्षित कशानें होतील इत्यादि समजणार आहे. वऱ्हाड प्रांतातील शाळा खात्याचे डेपुटि-साहेब यांनीं हें तपासलें आहे. किं० ८३

---

## शिवलिला १५ वा अध्याय

बहुतेकांजवळ शिवलिलामृत ग्रंथ आहे परंतु तो १४ अध्यायांचा असल्यामुळें ग्रंथ अपुरा होतो. म्हणून आम्ही वरील १५ वा अध्याय (श्रीधरस्वामी-कृत) नवीन छापविला आहे. यांत शंकराचार्यांनी,

जैनमताचें खंडण करून स्वधर्म कसा स्थापिला याची साग्र हकीकत आहे. शिवाय नित्यपाठाकरितां ह्मणून ४२ ओव्या दिल्या आहेत त्या वाचल्यानें सर्व ग्रंथ वाचल्याचें श्रय येतें. किं० २

---

## लालन बैरागीण

अथवा

## पानीपतचा घनघोर युद्धप्रसंग.

साहजीक मनोरंजन होऊन आपल्या शूर पूर्वजांचा पराक्रम समजावा, धैर्य, शौर्य, स्वदेशाभिमान स्वातंत्र्याभिलाषा, स्वधर्मश्रद्धा वगैरे सद्गुण अर्वाचीन लोकांच्या मनावर ठसावे, महाराष्ट्रभाषादेवीची यथाशक्ति सेवा घडावी, व ऐतिहासिक ज्ञानही व्हावें. अशा उद्देशानें वरील लालनबैरागीण नांवाची कादंबरी छापविली आहे.

मराठ्यांचे राज्यास अवनति येण्यास किंवा तें राज्य नाम शेष राहण्यास हाच पानिपतचा संग्राम मूळ कारण आहे. पुराणप्रसिद्ध कुरुक्षेत्रांत कौरवपांडवांची जी दशा, तीच पानिपतच्या रणकंदनांत मराठ्यांची युद्धस्पर्द्धा तेंच व प्रसंगही तसाच. कुरुक्षेत्रांत द्रोण आणि युधिष्ठीर, अर्जुन आणि कर्ण, कृष्ण आणि भीष्म समरोत्सुक झाले, तसेच पानिपतच्या घनघोर प्रसंगांत ही अनेक अतिरथी महारथी होते. अभिमन्यु सारखा शूर संधान करणारा विश्वासराव पेशवा, धृष्टद्युम्ना-

प्रमाणें खड्गपटु **जनकोजी** शिंदा, भीमार्जुनाप्रमाणें एक बाजू स्वतः संभाळणारे व युद्ध कलाकुशल **येशवंतराव** पवार घटोत्कचाच्या पर्वतवृष्टीप्रमाणें अनिवार्य जाज्वल्य लोहगोलांचा वर्षाव करणारा **इब्राहीमखान** गारदी, सुयोधनाप्रमाणें मानधनाग्रणणी व आकाश कोसळलें तरी न डगमगणारा, उदार, सत्य प्रतिज्ञ, रणधीर, वीर शिरोमणी **सदाशिवराव** भाऊसाहेब पेशवा इत्यादि अनेक वीर पुरुषांच्या हिकमती, कावेबाजपणा, शौर्य, धैर्य, प्रसंगावधान स्वहितदक्षता, मारिन किंवा मरेन असा अभिमान या कादंबरींत दाखविला आहे. लोकमित्र साच्याचीं पृष्ठें ३०० जवळ. किंमत १ रुपाया.

---

## श्रीराम आणि रावण.

### पौराणिक कादंबरी.

ह्या सुंदर कादंबरीचा नायक धीरोदार सकल सद्गुणसंपन्न अयोध्याधीश श्रीराम. श्रीरामाचा अतुल पराक्रम, अलौकिक पितृभक्ति, स्वदेशैकनिष्ठ सत्यप्रीयता, स्वधर्मश्रद्धा, धैर्य, शौर्य, गांभिर्य, व उदारता इत्यादि सद्गुण सर्वमान्य आहेत. हिंदुस्थानांतील प्रत्येक हिंदु, श्रीरामाच्या सद्गुणाचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करतो, ह्मणून त्याचें थोडक्यांत सविस्तर चरित्र सर्वसाधारण लोकांस यथातथ्य समजावें अशा उद्देशानें वरील पौराणिककादंबरी छापविली आहे. किंमत ८८

---

## आई आणि मुलें.

आपली संतति निर्दोष सुदृढ व सुशिक्षित व्हावी, अशी इच्छा बाळगणाऱ्या आईबापांनीं एकवेळ तरी या पुस्तकांतील विषयांकडे लक्ष द्यावें. किं० ०८

---

## प्रसंगरत्नावली

किंवा

## बुद्धिवैभव.

यांतील विषय किती योग्यतेचे व किती उपयोगीं पडणारे आहेत, हें येथें सांगून समजणार नाहीं. तरी पण, याच्या वाचनापासून आबालवृद्धांना पोट धर धरून हंसतां पुरे होईल. ज्ञान वाढून प्रसंगपांडित्य अंगीं येईल. व्यवहारज्ञान समजेल अनेक विषयांवर निबंध, गोष्टी, चुटके, पद्यें, कला कौशल्यें, आरोग्य वाढविणार औषधोपाय, पैसा कसा मिळवावा, काळाचा व्यय कशाप्रकारें करावा, अंगीं सभ्यता येण्यास कसें वागावें, कोणत्या वेळीं कसें बोलावें, विश्रांतीचा वेळ कसा घालवावा, नित्याचीं कर्में कोणतीं इत्यादि समजून अनेक प्रकारचे हितबोध वाचण्यास मिळतील व त्यायोगें मन चांगलें प्रगल्भ होऊन संसार यात्रा सुखावह होईल. एकंदरींत हें ज्ञानमंदिर प्रत्येक मनुष्यानें आपल्या व्यवहारिक उपयोगाकरितां जवळ बाळगावें. किं० ०१२

---